


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.






अनुक्रमणिका

# दीपावली

दीपावली

विश्व कथा अंक

जून १९६२
वर्ष १८ वें
मूल्य १ रु.









तुमच्या बांधकामाच्या
यंत्र सामग्रीचा पुरेपूर
उपयोग करून घ्या...

**'किर्लोस्कर बी-४'** इंजिन शक्तीचा भरपूर पुरवठा करते आणि त्याच्या साह्यानें, धरणें, पूल, कालवे, रस्ते इत्यादींच्या बांधकामांत उपयोगी पडणारीं यंत्रें, तसेंच जनरेटर, मोठमोठे पंप, क्रशर इत्यादींना शक्तीचा हमखास पुरवठा करतां येतो. चालविण्याचा खर्चही फारच कमी येतो.

हें इंजिन हातानें सहज चालू करतां येतें, चालू असतांना फारसें लक्ष द्यावें लागत नाहीं आणि तासन् तास बिनतक्रार काम देतें. कारण त्याचा प्रत्येक भाग कठीण कामगिरींतही उत्तम काम देईल असा मजबूत बनविलेला असतो.

४० अश्वशक्तीचें **'किर्लोस्कर बी-४'** इंजिन तुमच्या औद्योगिक व बांधकामाच्या यंत्र सामग्रीकडून जास्तीत जास्त काम करवून घेण्यांत उपकारक तर ठरतेंच पण शिवाय त्यांच्या चालविण्याच्या खर्चांतहि कितीतरी बचत होते.



" 26-40 HP 1000/1500 RPM "

# किर्लोस्कर
## बी-४ इंडस्ट्रियल डिझेल इंजिन

**किर्लोस्कर ऑईल इंजिन्स लिमिटेड, खडकी, पुणें ३ (भारत)**

'TOM & BAY' KOEL/M-10/61

## विश्व कथा – अंक









वर्ष १८ वें  जून १९६२


● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ●

### श्रेयनामावलि–



या अंकांतील. '**चांपून**', '**तमांथीचा वाघ**', '**माझे नवे काका**' या कथा नव्यानें प्रसिद्ध होणाऱ्या '**द पर्शिया मॅगेझिन**' यांतील कथांचे अनुवाद आहेत. अनुवाद प्रसिद्ध करण्यास तत्परतेनें परवानगी दिल्याबद्दल चालकांचे आम्ही आभारी आहोंत.

**संपादक**


टेलिफोन ७७७६५

दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

* संपादक-मुद्रक-प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४ * या प्रतीस किंमत रु. १ अधिक रजिस्टर पोष्ट ५०न.पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. * या अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं.




अनुक्रमणिका



भवभूती :

अविदितगतयामा रात्रिरेव व्यरंसीत् ॥

# कविता कामिनीची करुणा

आठव्या शतकांतली गोष्ट. शारदेच्या न्यायपीठासमोर एक सोन्याचा नाजूक ताजवा होता. हिऱ्याच्या अत्यंत सूक्ष्म अणीवर तो झुकत असे. त्याच्या एका पारड्यांत कालिदासाची कविता ठेवलेली होती. दुसऱ्या पारड्यांत एका नवकवीची कविता ठेवण्यांत आलेली होती. तरफ उचलण्यांत आली तोंच नवकवीची कविता हळूहळू वर जाऊं लागली. हें दिसतांच कुणाच्या नकळत शारदेनें आपल्या हातांतील कमळ जरा हलविल्यासारखें केलें; आणि त्यांतील मधाचा एक सूक्ष्मतुषार नवकवीच्या कवितेवर टाकला, त्याबरोबर दोन्हीं पारडीं सारखीं झालीं.

हा नवकवि म्हणजे भवभूती होय.

कालिदासाला काव्यांत ज्याप्रमाणें भारवी टक्कर देऊन राहिला आहे, त्याप्रमाणें नाटकांत त्याला भवभूतीनें तोडीस तोड दिली आहे. भवभूतीचें उत्तररामचरित नाटक श्रेष्ठ काव्य होय कीं कालिदासाचें शाकुंतल, हा वादविषय अजूनही अनिर्णित आहे. या वादाचा जो निर्णय शारदेनें वरील दंतकथेंत दिला तो वास्तविक मान्य व्हावयास हरकत नसावी.

मोहक अर्थवाही शब्दांची मधुर रचना करण्यांत कालिदासाचा हात कोणीही धरूं शकत नाहीं. त्यामुळें त्याच्याशीं तोडीस तोड ठरणाऱ्या कवींतसुद्धां मधाचा एक कण तरी कमी पडतोच. माधुरीची ही गोष्ट सोडून दिली तर आशयघनतेच्या बाबतींत भवभूती हा अग्रगण्य आहे.

भवभूतीचीं महावीरचरित, मालतीमाधव आणि उत्तररामचरित अशीं तीन नाटकें उपलब्ध आहेत. उत्तररामचरित हें या








मालेंतील कौस्तुभमणी होय. नाट्यरचना या दृष्टीनें रामचरित हा विषय अतिभव्य असल्यानें रचनेंत तो नीट आवरता आला नाहीं तरी काव्य या दृष्टीनें त्याची माधुरी केवळ निरतिशय आहे.

राम आणि सीता यांचे आदर्श दांपत्यजीवन हा काव्याचा विषय. रामसीतेच्या एकत्र जीवनाचें वर्णन करतांना भवभूती अर्ध्याच श्लोकामधें या दांपत्यजीवनाचें भव्योदात्त चित्र उभें करतो. रामसीता गुजगोष्टी बोलत असतां रात्रच संपून गेली (पण गोष्टी संपल्या नाहींत) हा तो श्लोकार्ध. यामधें दांपत्यजीवनांतील मनोमालनाचे जें हृद्य चित्र दिसून येते तें संस्कृत साहित्यांत जवळ जवळ दुर्मीळ आहे.

अर्थात इतकीं मनें जुळलेल्या दंपतीमध्यें विरह घडणें शक्य तरी आहे काय ? पण अशक्य दिसणारा हा विरह परिस्थितीनें रामसीतेमध्यें घडवून आणला. कांतेविषयीचें प्रेम आणि राजाचें कर्तव्य या दोन उदात्त भूमिकांतील प्राणांतक संघर्ष इतक्या कुशलतेनें चित्रित केलेला जगाच्या वाङ्मयांत कुठेंही सांपडणार नाहीं. सीतेस अन्याय झाला असें मानणारे स्त्रियांचे कैवारीसुद्धां या अन्यायाबद्दल रामाला यत्किंचितही दोष देऊं शकत नाहीत. उलट सहृदय मनांत सीतेपेक्षां रामाविषयींच अनुकंपा आणि सहानुभूति वाटावी अशी किमया या कुशलतेंत आहे. कायमचा विरह झाला असतांही आणि त्या विरहानें हृदय फुटत असतांही विरह झालाच नाहीं, उलट राम आणि सीता हे सांवलीप्रमाणें एकमेकांच्या कायमचे जवळच आहेत असा भ्रम व्हावा अशीही किमया या कुशलतेंत आहे.

ही अनुपम किमया भवभूतीनें ज्या सामर्थ्याच्या जोरावर साध्य केली तें सामर्थ्य कशाचें बरें ? विमल हृदयाला पीळ पडून निघालेल्या एका निरागस अश्रूंचें हें सामर्थ्य आहे. अश्रु इतका सामर्थ्यवान असूं शकेल ? अवश्य ! अवश्य !! रामसीतेच्या अश्रुमुळें सारें त्रिभुवन रडूं लागतें. वृक्ष रडतात; लता रडतात; पाषाण रडतात; पर्वत रडतात, नद्या रडतात; पुलिनें रडतात; पशु रडतात, पक्षी रडतात. सारें चराचर विश्व रडतें. हे अश्रु भेकडाचे असते तर त्यांना कोणी विचारलें नसतें. पण हे अश्रु समर्थांचे आहेत. सारें भुवन ढवळून टाकण्याचें सामर्थ्य त्या अश्रूंमध्यें आहे. या अश्रूंस दांभिक शिष्टाचारांचा बंद घालावयाचा प्रयत्न न करतां मोकळ्या निरागस भावनेनें त्याला वाट करून दिलेली आहे. हे अश्रु किती ! एक ! दोन ! छे अश्रूंची संततधार. या पवित्र धारेची जणूं नदी होऊन ती गोदावरी रूपानें अजून वहात आहे.

नाइलाज म्हणून पतीला पत्नीचा त्याग करावा लागला तरी त्या त्यागांतून त्यांच्या मनाची जवळिक आणि अतूट एकता याचें जें परम रमणीय चित्र या अश्रूंच्या बिंदुबिंदूतून शतरंगानीं परावर्तित होते. त्याच्या सहस्रांशही एकता दांपत्यजीवनांत लाभली तर तें दांपत्य जीवनसुखाच्या शिखरावर आहेसें वाटावें इतकं हें चित्र भव्य आहे. या एकतेच्या महान चित्रामधें शारीरिक हीन वासनेची एकही थिल्लर छटा नाही हें पाहिलें कीं रामसीता वंद्य का झालीं याचें इंगित कळून येतें.

भवभूतीनें या ठिकाणीं करुणरस मूर्त केला आहे. साऱ्या विश्वाला धुवून पवित्र करील अशी उधाण लाट इथें त्यानें आपल्या मनांतील करुणासागराला आणली आहे. भवभूती हाच मुळीं शारदेची मूर्त करुणा आहे.

हा सहृदय मनुष्य कसा असावा बरें ? हरिजनांच्या मुलास कडेवर घेणाऱ्या एकनाथांची उपमा त्याला साजून दिसेल ? क्रौंचवधानें व्याकूळ झालेल्या करुणाद्रवन वाल्मिकी मुनींची उपमा त्याला शोभेल ? गजेंद्राच्या मोक्षाला धांवणाऱ्या करुणामय भगवंताची उपमा याला चपखल बसेल ? की त्या साऱ्या उण्या पडतील !

अथांग करुणेनें भरलेलें त्याचें हृदय. तें सदा डोळ्यांतून प्रेमाचा वर्षाव करीत असणार. जसें कीं संत जसें कीं तें माउलीचें मन. तुमचीं सारी दुःखें माझ्याकडे आणून ठेवा इथें त्यांना जागा आहे असें त्याचे डोळे सारखे बोलत असणार.

शारदेची मूर्त करुणा असा हा भवभूती आपल्या महाराष्ट्रांत विदर्भांत होऊन गेला, त्याला बाराशें वर्षें होऊन गेलीं. शारदेनें त्याच्या आधीन केलेली करुणा अजून त्याच्या आधीनच आहे. आणि गोष्टी संपल्या नाहींत पण रात्रच संपली असे म्हणणाऱ्या त्या धन्य आणि सुखी जोडप्याहून अधिक धन्य आणि सुखी जोडपें अजून जन्माला यावयाचें आहे. संसार करावा राम आणि सीता यानींच आणि तो वर्णावा भवभूतीनेंच.

**—आनंद साधले**










# आजीचें घर

**श्री. सदानंद रेगे हे स्कँडिनेव्हियन देशामधें तेथील भाषेचा अभ्यास करण्यासाठीं एक वर्ष राहून यशस्वी होऊन नुकतेच परत आले. मराठींतील या समर्थ कथाकारानें स्टिग् डागेरमन् या ऐन तिशींत दिवंगत झालेल्या लेखकाच्या मूळ स्विडीश कथेवरून दीपावलीसाठीं केलेला समर्पक अनुवाद.**

आजीचं घर कस शांत होतं. तो लहान मुलगा सारखा या खोलींतून त्या खोलींत करीत होता; तो स्तब्धतेच्या शोधांत होता. कुठं ना कुठं ती असायलाच हवी. कुठल्या तरी खोलींत ती खुर्चीवर रेलून बसली असेल नि पुस्तक वाचीत असेल. एकेका खोलीचं दार तो किलंकिलं करी नि आंत डोकावून चाहूल घेई. खोलीचीं दारं भलीं उंचाडीं होतीं अन् त्यांच्या कड्या सोनेरी होत्या. त्या दारांच्या मानानं तो अगदींच लहान होता. कसल्यातरी भीतीमुळें त्याचं काळीज जलद चालणाऱ्या घड्याळासारखं धड्धड् उडत होतं. अगदीं शेवटल्या खोलीपाशीं आल्यावर त्यानं डोळे गच्च मिटून घेतले. हो, कुणी सांगावं ती हिडिंबा कशी दिसत असेल ती! दाराला कान लावून त्यानं चाहूल घेतली.. आंत ती बसली आहे कीं नाहीं याचा मागोवा घेतला.

वादळाचे भोंवरे कांपीत कांपीत, पिसाळलेल्या लाटेवरून हिंदोळत जाणाऱ्या एका भल्यामोठ्या जहाजाची चाहुल त्याला लागली. एक न दिसणारी मुलगी फुलांच्या थराखालीं पुरण्यांत आली होती अन् आपण मेलों म्हणून ती ओक्साबोक्शी रडत होती. आजोबांचे बूट लांकडी फळ्यांवरून येरझारा घालीत होतें. पण स्तब्धतेची जाग मात्र कुठंच दिसत नव्हती. मग हळू करून त्यानं डोळे उघडले नि तो शेवटल्या खोलींत शिरला.

खोली त्याच्यासारखीच लहान होती. तिच्या चकचकीत जमिनीवर, मधोमध उन्हाचा एक चौकोनी तुकडा पडला होता. तो मुलगा त्या तुकड्यावर येऊन उभा राहिला अन् कितीतरी वेळ कान देऊन ऐकत राहिला. आजीचं घर कसं शांत होते, अगदीं चिटपांखराचा

आवाज देखील तिथं येत नव्हता. एकायलं येत होतो ती फक्त त्याच्या काळजाची फडफड. चित्रांतील जहाज पुन्हां चित्रांतल्यां सारखं झालं होतं. कपाटावरचं त्या मेलेल्या मुलीचं चित्र रडायचं थांबलं होतं. फरसबंद स्टोव्ह अन् उंच खिडकी यांच्या मधोमध एक स्टूल होतं अन् त्या स्टुलावर आजोबांचे उंच काळे बूट होते. तेहि अगदीं गडीगुप्प उभे होते. आतां आजोबा सूर्यावर होते अन् प्रेमळ नजरेनं ते तिथूनच खालीं बघत होते. सूर्यावर ढग आले कीं मात्र त्यांचा चेहरा दुःखी होई अन् मग ते आपल्या घरांत निघून जात. त्या मुलाच्या मनांत विचार आला : पाऊस पडत असला म्हणजे मरणं किती कठिण होत असेल !

हळूंहळूं दुपार टळत चालली. तो उन्हाचा चौकोनी तुकडा अधिकाधिक लहान होऊं लागला. पण त्या मुलाच्या कांहीं तें लक्षांत आलं नाहीं. त्यानं पुन्हां डोळे मिटून घेतले, अन् काय चमत्कार ! त्याच्या मिटलेल्या डोळ्यांपुढें एक तेजाचा लोळच्या लोळ आला अन् त्याच्या शरीराचा कणनकण त्याने धवळून निघाला. तेवढ्यांतच कुणीतरी कानांत कुजबुजतं आहे असं वाटलं. 'आतां...आतां... अगदीं या-या क्षणीं !' घड्याळानं टोले दिले. तसाच मागे पावलं टाकीत टाकीत तो त्या चौकोनांतून निसटला अन् थोड्या वेळानं त्यानं जेव्हां डोळे उघडले तेव्हां आजोबांच्या बुटांतला एक जडसा बूट आपल्या हातांत आला आहे, असं त्याला आढळून आलं. अगदीं तळहाताच्या फोडासारखा जपत त्यानं तो बूट जमिनीवर ठेवला. सारं जग त्या क्षणीं मौनांत अगदीं बुडून गेलं होतं.

हजारों वर्षें ते बूट परस्परांना बिलगून उभे होते. दगडाखडका इतके ते जुने होते. रानांतल्या वाटेएवढं त्यांचं वय होतं. अन् आतां ही पुरातन जोडी फुटली होती. ही फारकत ज्या क्षणी झाली त्या क्षणी कुणालाही ऐकूं जाणार नाहीं असा एक हुंदका फुटला होता अन् त्याच्या आघातानं ती खोली थरथर कापत होती. त्या मुलाच्या देहांतूनहि भीतीचे सर्प सळसळत चालले होते. तसाच, स्वतःला नकळत तो स्टुलावर चढला अन् कितीतरी वर्षं त्याला हूल दाखवित दाखवित इथवर आलेल्या स्वप्नाचं फुलपाखरूं त्यानं अखेर धरलं. आजोबांच्या त्या उंचाड्या बुटांत त्यानं आपलं इवलं शरीर झोकून दिलं अन् हळूंहळूं त्यानं त्याचा तळ गांठला.

तळांशी आल्यावर क्षणभर तो तसाच उभा राहिला. आतां पुढं काय ? पुढं काय असायचं ? कांऽऽहीं नाहीं. नुसतं उभं रहायचं. नुसतंच. एव्हांना संध्याकाळ झाली होती अन् तिन्हीसांजांच्या किरमिजी सांवल्या मांजरपावलांनीं खोलींत येत होत्या. त्या मुलानं पुन्हां डोळे गच्च मिटून घेतले अन् मागल्या वेळेप्रमाणें याहि वेळीं तें अद्भुत घडून आलं. तो बूट आपणहूनच चालूं लागला अन् भिंतींतून आरपार निघून सरळ बागेत आला. बाग ओलांडून त्यानं रस्ता गांठला. मग उघडींबोडकीं शेतं लागलीं. त्या शेतांची कुंपणं ओलांडून तो रानांत आला. जिथं जिथं म्हणून त्यानं पाऊल टाकलं तिथले तिथले सगळे आवाज नाहींसे झाले. पांखरं मुकीं झालीं. कोंवळ्या कोंवळ्या पानांचा तोबरा भरून राहिलेलीं सांबरं तशींच आ वासून पहात राहिलीं अन् गवतावरून सरपटत जाणारे सर्प काळ्या काळ्या होऊन पडले. 'आपण चाललों आहोंत तरी कुठं ?' त्या मुलानं हळूंच बुटाला विचारलं अन् हळूंच तो बूट म्हणाला, 'आपण चाललों आहोंत स्तब्धतेकडं.' एकाएकी एक अक्राळविक्राळ काळाकुट्ट पहाड त्यांच्यासमोर उभा राहिला. बूट म्हणाला, 'इथंच जायचंय् आपल्याला !'

पण त्या पहाडांत ते कांहीं जाऊं शकले नाहींत. ते आत शिरणार तोंच कुठून तरी कसलासा आवाज आला नि त्या मुलानें दचकून डोळे उघडले. तो त्याच्या आजीचा आवाज होता. गोंधळून त्यानं इकडेतिकडे पाहिलं. तो रानांतून केव्हां परत आला होता कुणास ठाऊक ! त्याची आजी त्याला हांका मारीत होती. करकरीत तिन्हीसांजा झाल्या होत्या. आजोबांचा बूट देवासारखा निमूट होता. आजी पुन्हां पुन्हां त्याला हाका मारीत होती अन् तो बुटांतून बाहेर पडायचा प्रयत्न करीत होता. खूप धडपड करूनहि त्याला बाहेर येतां येत नव्हतं तो आंतच अडकून पडला होता. आजोबांच्या बुटानं त्याला अगदीं घट्ट आंवळून धरलं होतं. खूप मोठ्यानं आपण ओरडावं असं त्याला वाटत होतं. पण त्याची वाचाच उमटत नव्हती. खालीं, खालीं...दूर कुठं तरी त्याचे पाय तेवढे किंकाळ्या मारीत होते. श्वापदं भांडतात तसे ते भांडत होते. अन् अकस्मात् पुन्हां एकदां अद्भुत घडलं. आजोबांचा बूट एकाएकीं दुभंगाला नि तो मुलगा त्या बुटांतून बाहेर फेंकला गेला. कसाबसा तो उठून उभा राहिला तेव्हां त्याची आजी त्याला तिसऱ्यांदा हांक मारीत होती.

बावरलेल्या मनःस्थितींतून तो मोठ्या प्रयत्नानें बाहेर पडला नि आजोबांचा तो फाटलेला बूट छातीशी कवटाळून क्षणभर ताठ उभा राहिला. पुन्हां त्यानं आपले डोळे गच्च् मिटले. पण या खेपेला तसं कांहींच घडलं नाहीं. मिटलेल्या डोळ्यांच्या द्रोणांत फक्त अंधार होता अन् कातड्यांच्या पारदर्शक भिंतीबाहेर आजोबांचा बूट किंकाळत होता, पण त्याचं तें किंकाळणं कुणालाच ऐकूं येत नव्हतं. आजीचं घर कसं शांऽऽत होतं, पण ती शांतता दगलबाज होती, दुष्ट होती. काळोखांत दबा धरून बसलेल्या श्वापदासारखी ती अक्राळविक्राळ होती. तो मुलगा तसाच सूंसाट सैरावैरा धांवत सुटला, पण त्या आधी त्यानं आजोबांचा बूट आजीच्या पलंगाखालीं लक्ष्य धरून असलेल्या





अनुक्रमणिका

त्या भयंकर अंधाराच्या दरींत भिरकावून दिला. मग हळूंच त्यानं दिवाणखान्याचं दार उघडलं नि चोरट्या मांजरासारखा आंत आला.

आजी खुर्चीवर बसलेली होती. त्या खुर्चीची पाठ उंच, उंच होती. खोलींत फारसा उजेड नव्हता. फुलदाणींत फुलं होतीं पण नुसतींच होतीं. आजीनं अजून एकहि दिवा लावला नव्हता. जमिनीवर पसरलेल्या सतरंजीवरून पावलं टाकीत टाकीत तो आजीजवळ येऊन उभा राहिला, पण आजीच्या तें लक्षांतहि आलं नाहीं. शोधक, क्रूर नजरेनं तो तिचा पांढरा फटफटीत चेहरा, न्याहाळूं लागला. आजीनं डोळे मिटून घेतले होते. डोळे मिटून, ती काय करते आहे, हेंच त्याला कळत नव्हतं. कदाचित ती झोंपायला जाण्याचा विचार करीत असेल. नाहीं...नाहीं...तिनं झोंपायला जातां कामा नये...त्यानं चटकन तिच्या हाताला स्पर्श केला तशी ती दचकली अन् पटकन तिचे डोळे उघडले. म्हणजे ती झोंपायला जायचा विचार करीत नव्हती तर ! ती दुसराच कसलातरी विचार करीत असली पाहिजे. तिनं आपल्या झोंपाळू शरीराला एक हिसका दिला नि त्याच्याकडे हंसत पहात ती म्हणाली,

'काय करीत होतास रे ?'

'आजीग, स्तब्धता...स्तब्धता म्हणतात ती कुठं रहाते ग !'

समोरच्याच टेबलावर एक पांढरा शुभ्र शंख ठेवलेला होता. कितीतरी वेळां त्यानं तो कानाला लावून पाहिला होता. आजीनं तो उचलला नि त्याच्या कानावर धरला. त्याचा स्पर्श त्याला थंडगार वाटला, कठीण वाटला. तिथनं पळून जावं असं त्याला वाटूं लागलं.

'येतं का ऐकायला ? काय सांग बरं ?'

'समुद्राचा आवाज.'

तो खोटं बोलत होता. खरं म्हणजे त्याला कांहींच ऐकायला येत नव्हतं. अगदीं एवढासासुद्धां कसला आवाज ऐकूं येत नव्हता. तो शंख मेलेला होता. त्यानंच त्याला ठार मारलं होतं. तसाच त्यानं तो शंख टेबलावर ठेवून दिला.

आजी म्हणाली, 'स्तब्धता अशी नसतेच मुळी. सगळंच आपल्याला ऐकूं येत असतं. आपण ज्याला स्तब्धता म्हणतो तो फक्त आपला बहिरेपणा असतो. आपण सारींच माणसं आहोंत तितकीं बहिरीं नसतों तर आपल्याला वाटतं तेवढं हें जग दुष्ट वाटलं नसतं. पण नशिबानं ऐकायला येणारीहि माणसं आपल्यांत आहेत. कांहीं माणसं तर उजाड माळावरहि ताठ उभीं राहूं शकतात--कळतं का मी सांगत्यें त्यांतलं कांहीं ?'

'हो.'

'हीं उजाड माळावरचीं माणसं डोंगरांचीं गाणीं ऐकतात. डोंगराच्या पलीकडे काय चाललं आहे हेहि त्यांना ऐकूं येतं. दरींतल्या माणसांचे आवाज त्यांच्या कानीं पडत असतात. शहरांलीं माणसं कशी धडपडत असतात. अन् ठेंच लागून सारखी पडत असतात याचाहि ते मागोवा घेऊं शकतात. समुद्राचा आवाज ते ऐकूं शकतात. रात्रीं अंधारांतून पाणी कापीत जाणाऱ्या जहाजांची चाहूल त्यांना येते अन्, पाण्यांत तरंगत ठेवलेल्या बेल-बॉयजचीहि किणकिण त्यांच्या कानावर येते. अन् लढाई आली आणि कीं समुद्राच्या पलीकडल्या लोकांचेहि आक्रोश ते सहजपणें ऐकूं शकतात, समजलं.'

'लढाई...लढाई म्हणजे शिपाई ?'

आजी गप्पच होती, पण तिचे ते शब्द धुराच्या दाट थरासारखे त्याच्या कानांभोंवतीं सांकळून राहिले होते. तो शंख ज्या टेबलावर होता त्याच टेबलावर एक टपोरं सफरचंदहि होतं. बचक्याएवढं. पिवळं धमक.

'आजी, आपल्याला सफरचंदाचाहि आवाज ऐकूं येतो का ग ?'

'हवा त्याचा आवाज तुला ऐकूं येऊं शकेल.'

तें सफरचंद थंडगार नि आंबट होतं. त्यानं तें उचलून आपल्या कानाला लावलं.

'काय ऐकायला येतं ?' आजीनं विचारलं.

'वारा वहातो आहे त्याचा आवाज.' तो म्हणाला.

पण हेंहि साफ खोटं होतं. त्याला कांहींच ऐकूं येत नव्हतं.

कदाचित् यापुढें त्याला काहींसुद्धां ऐकूं येऊं शकलं नसतं.

आजी, खरंच का ग तुला अगदीं सगळ्याचा–सगळ्याचा आवाज ऐकूं येतो ?' त्यानं विचारलं.

त्याच्या प्रश्नांतली चीड आजीच्या लक्षांत आली नाहीं. तिनं त्याच्या प्रश्नालाहि कांहीं उत्तर दिलं नाहीं. ती खुर्चीतून चपळ उठली नि तिनं त्याचा हात आपल्या हातात घेतला. त्याला वाटलं, आजी झोंपायला चालली आहे. त्याला तर झोंपायला जायचं नव्हतं. अखेर तीं दोघं बाहेरच्या बाजूला आलीं नि पायरीवर उभं राहून बागेकडे पाहूं लागलीं. बागेंत डहालियाचीं फुलं होतीं. सफरचंदाचीं झाडं होती. वारा पडलेला. रस्ते निर्जन. एखादं पांखरूंहि कुलकुलत नव्हतं कीं गांवांत कुत्रंसुद्धां भुंकत नव्हतं. नितळ स्तब्धतेच्या पडद्याआडून चांदण्या ठळकपणें डोकावत होत्या. एक तांबडी भिंत जमिनीतून वर आली होती. आकाशाच्या खांद्यावर गांवचे दिवे लुकलुक करीत होते.

आपल्या साऱ्या शक्ति एकवटून त्यानं ऐकण्याचा प्रयत्न केला. आपल्या श्रुतींच्या मेण्यांत बसून त्यानं सबंध पृथ्वीभोंवतीं प्रदक्षणा घातली. पण मेणा तसाच रिकामा परत आला. तेवढ्यांत एक सफरचंद झाडावरून निखळून पडलं नि त्याचा धप् असा आवाज झाला.

आजीनं त्याच्या खांद्याभोंवतीं आपले हात लपेटले नि विचारलं, 'ऐकलंस ?'

'हं...कुत्र्याचा आवाज.'

खरं म्हणजे त्याला कांहींसुद्धां ऐकू आलं नव्हतं. तेवढ्यांत आजीचे हात थरथर कांपूं लागल्याचं त्याच्या लक्षांत आलं. पण असं कां ? आजीचे हात एकदम लटपटूं कसे लागले ?

'एक कुत्रा रस्त्यानं चालला आहे अन्... त्याच्यामागून शिपायांची एक पलटण.' तो म्हणाला.

'शिपायांची पलटण...' केवढा आत्मविश्वास होता त्याच्या बोलण्यांत. अन् मग अकस्मात त्याच्या डोक्यांत प्रकाश पडला.




आजीचे हात असे एकदम कां थरथरूं लागले, हें त्याला कळून आलं. आजी भ्याली होती. त्याला ऐकूं आलं ते तिला ऐकूं आलं नव्हतं. कदाचित त्याच्यापेक्षां तिलाच अधिक भीति वाटली असावी. आपण आजीपेक्षां कमी भ्यालो आहोंत या जाणीवेनेंच त्याला हायसं वाटलं.

तेवढ्यांत आजी कुजबुजली, 'अन् पलटणीच्या मागोमाग कोण येतं आहे ?'

त्यानं काळोखाची चाहूल घेतली, पण कांहींसुद्धां त्याला ऐकूं आलं नाहीं. त्याच्या काळजाची धडधडसुद्धां या खेपेला त्याला ऐकूं आली नाहीं.

'पलटणीच्या मागोमाग...पलटणीच्या मागोमाग आहे एक भलीमोठी गाडी' तो म्हणाला.

'भली मोठी कशावरनं ?'

'तिच्या चाकांचा आवाज ऐक कीं.'

आजीला आतां श्वास घेणंहि कठीण जात होतं. वाऱ्याची एक आळशी झुळूक झाडांतून सळसळत चालली होती. पण कुणालाच तिची जागही नव्हती.

'अन् गाडीच्या पाठोपाठ ?'

'एक ढोल वाजवणारा माणूस.'

'मला कसा ऐकूं येत नाहीं त्या ढोलाचा आवाज ?'

आजीला चांगलीच धाप लागली होती.

'तुला का ऐकूं येणार तो ? काळोख पडलाय् म्हणून तो अगदीं हळूं वाजवतो आहे ढोल.'

असाच खूप वेळ गेला. आतां कदाचित आजी कधींच घरांत जाणार नाहीं अशी भीति त्याला वाटूं लागली. अन् ती घरांत गेली नाहीं तर आजोबांचा एक बूट हरवला आहे हें तिला कसं कळणार? आजी थरथर कापत उभी होती. तिच्या कडकड वाजणाऱ्या हाडांचा आवाज कान शाबूत असलेल्या कुणालाहि ऐकूं आला असता. पण जगांत कान शाबूत असलेला असा आहे तरी कोण ? अधिकाधिक दाट होत चालल्याचा काळोखांतून रस्त्यावरची ती मिरवणूक कांसवाच्या गतीनं चालली होती.

आजीनं पुन्हां विचारलं,

'ढोलवाल्याच्या पाठोपाठ कोण आहे ?'

'ढोलवाल्याच्या पाठोपाठ आहेत दोन घोडे.'

'मला कसा ऐकूं येत नाहीं त्यांचा आवाज ?'

'काळोख पडलाय म्हणून ते आपल्या खुरांचा आवाज होऊं देत नाहींत म्हणून.'

त्याच्या मनांत एक दगडाचं भयंकर झाड झपाट्यानं वाढत होतं.

'अन् घोड्यांच्या मागून ?'

'घोड्यांच्या मागून कुणीतरी रडत रडत येतं आहे.'

त्याच वेळीं कुंपणाच्या झाडींत एक पक्षी ओरडला. त्याला कांहीं ऐकूं आलं नाहीं; पण आजीनं मात्र तो आवाज ऐकला. ती म्हणाली मला ऐकायला येतंय तर ? चल बाळा, आपण आंत जाऊं. मला





थंडी वाजत्येय. तुरुतुरु ती आंत गेली. जणू तें भयंकर आंत शिरा-यच्या आधींच तिला दार लावून घ्यायचं होतं. ती त्याला पाहूं लागली पण तो होता कुठं तिथं ? धांवत धांवत तो घराच्या पायऱ्या उतरत होता.

'माझा चेंडू आणायला चाललोय मी.'

त्याचा चेंडूबिंडू तिथं कांहीं नव्हतं.

खरं म्हणजे त्याच्याकडे कांहींच नव्हतं. एका झाडाखाली पडल्या पडल्या तो देवाची प्रार्थना करूं लागला, 'देवा, आजोबांचा तो बूट नीट कर रे देवा, पुन्हां पुन्हां मला ऐकायची शक्ति दे रे.' पण देवाला तरी कुठं ऐकूं येत होतं ? त्यानं फक्त स्तब्धतेचा एक अकाळविकाळ, काळाभोर पंख पसरला नि त्याखाली त्याला घेतलं.

रस्त्याच्या पोटाखालून, दगडांशीं कानगोष्टी करीत वहाणारा बागेंतील ओढा आतां अगदीं स्तब्ध होता. त्या ओढ्याचा आवाज त्याला ऐकायचा होता. तसाच तो उठला नि फाटकापाशीं आला. तेवढ्यांत रस्त्यावरच्या काळोखांतून एक माणूस येतांना त्याला दिसला.

त्या माणसांत कांहींतरी विचित्र होतं. त्याची चाल चमत्कारिक होती. क्षणभर पुढें, क्षणभर मागें, अशा कसा तरी तो चालत होता. रस्त्यावर दुसरं कुणीच नव्हतं, पण तरीहि तो कुणाशीं तरी भांडत असल्यासारखं वाटत होतं. क्षणांत तो भांडे, क्षणांत गायला लागे अन् पुन्हां भांडूं लागे. कुंपणाच्या झाडीआडून तो मुलगा हें सारं अद्भुत पहात होता. त्याचं काळीज भीतीनं थाड्थाड् उडत होतं. मग तो माणूस काळोखांत दिसेनासा झाला अन् त्याचबरोबर त्याची जागहि गेली. आतां कांहींहि ऐकूं येत नव्हतं. त्याच्या पावलांचा आवाजसुद्धां.

माणसं असतात म्हणून त्यांची चाहूलहि ऐकतां येते. पण जें नसतं तें त्याला ऐकायचं होतं. हें कसं काय शक्य होतं ? तें शक्य नाहीं या जाणीवेनं त्याच्या पोटांत भीतीचा गोळा उभा राहिला. तसाच तो चोरपावलांनीं घरांत आला.

स्वैंपाकघरांतूनच त्याला दिसलं कीं, आजी झोंपायच्या खोलीच्या उंबऱ्यावर उभी आहे. फावड्यानं जमीन उकरावी तसा तिचा चेहरा दिसत होता. अन् नजर ताणून ती त्याच्याकडे निश्चलपणें पहात होती. आजीला सर्व कांहीं कळून चुकलं आहे हें त्यानं हेरलं अन् त्यांच क्षणीं, त्याच्या ध्यानांत यायच्या आंतच, तो ओरडला,

'आजी, आजी, रस्त्यावर एक माणूस पडला आहे.'

त्याच्या ओरड्यानं चकलेली आजी थरथर कांपत नि धापा टाकीत त्याच्या दिशेनं येऊं लागली. तिचे ओठ एकदोनदां हलले पण एक शब्दहि त्यांतून बाहेर पडला नाहीं. स्वप्नांत पहावं तसं खुंटीवरचा लोंकरी स्वेटर आपल्या कांपऱ्या हातांनीं काढून घेतांना ती त्याला दिसली. क्षणार्धांतच तीं दोघं बाहेरच्या काळोखांत आलीं. मुकी बाग ओलांडून, थरथरत्या पावलांनीं तीं थंडगार, स्तब्ध, काळ्याकुट्ट रस्त्यावर आलीं. चांदण्याच्या धुक्यानं अवकाश कांठोकांठ डुचमळत होतं. तेवढ्यांत एकाएकीं कुंपणाच्या झाडापाशींच आजी थबकून उभी राहिली नि तिनं विचारलं,

'कुठं ?'

'इथं नाहीं. जरा पुढं' तो म्हणाला.

कुंपणाच्या सांवलींतून चालत चालत तीं दोघं पुढं झालीं. कुंपण संपलं तशी आजी पुन्हां थबकली. पुढें पाऊल टाकायचा धीर तिला होत नव्हता. त्यालाहि होत नव्हता. पण करतो काय ? त्याला तर पुढें जायलाच हवं होतं. थोडं पुढं गेल्यावर तो एके ठिकाणीं खालीं वाकला नि म्हणाला,

'इथं.'

आजीला कांहींच समजलं नाहीं. तरी पण तिनं विचारलं,

'कसा दिसतो आहे तो ?'

मुलानं रस्त्यावरचे दोन तीन दगड उचलले नि तो म्हणाला,

'उंचाड्या आहे. केवढा तरी मोठा आहे. अन् त्याच्या तोंडावर एक हॅट आहे.'

'ती हॅट काढून बघ पाहूं.'

मुलानं हॅट काढल्याचं सोंग केलं.

'श्वास चालूं आहे का त्याचा ?'

मुलानं जमिनीला कान लावून पाहिलं. काय करावं नि काय नाहीं हेंच त्याला कळेनासं झालं होतं. भवतालच्या अंधारांत त्यानं आपली नजर खोल खुपसली. सगळं कसं अगदीं गडीगुप्प होतं. काळोखांत काळोख असावा तशीं कांहीं झाडं त्या कुरणांत उभीं होतीं. तीं आपल्याच दिशेनं एकेक पाऊल पुढं टाकीत येताहेत असं त्याला वाटत होतं. त्यानं डोळे गच्च मिटून घेतले. वाऱ्याची एक कढत झुळुक त्याच्या कानांत शिरली नि रस्त्याच्या कडेंतून कुणाचा तरी श्वासोच्छ्वासाचा अस्पष्ट आवाज त्याला ऐकूं आला.

'आजी, झोंपलायसा वाटतो हा,'

आजीनं सुटकेचा निःश्वास सोडला. भवतालच्या काळोखा-सारखाच खोल...खोल.

'उठव त्याला. अशा थंडींत उघड्यावर पडून कसं चालेल' ती म्हणाली.

मुलानं आपला रिकामा हात हवेंतून फिरवला. मग त्यानं पुन्हां डोळे मिटून घेतले नि चाहूल घेतली. कुणीतरी घोरंत असल्याचा, कुजबुजत असल्याचा आवाज त्याच्या कानीं आला.

'काय म्हणतो तो ?' आजीनं विचारलं.

'तो म्हणतो, तूं आपला घरीं जा कसा मी झोंपलेलो नाहीं कांहीं. सहज पडलों आहे वाऱ्यावर येऊन जरा. थोड्याच वेळानं जाईन मी इथनं.'

एक उडी मारून तो पुन्हां कुंपणापाशीं आला. आजीनं आपला हात छातीशीं धरला होता, तो त्यानं आपल्या हातांत घेतला नि काळया, विश्वासू, सांवल्यांच्या आधारानं ती दोघं मागें फिरलीं. तेवढ्यांत वाऱ्याची एक प्रसन्न झुळूक त्या काळोखांतून आरपार निघून गेली. झाडांच्या फांद्या हिंदोळूं लागल्या. पानं सळसळ करूं लागलीं. रस्त्याच्या पलीकडल्या अंगानं, दगडांशीं कानगोष्टी करीत ओढा वहात होता. अन् ढगांच्या अरण्यांतून एक कणखर, घनगंभीर आवाज त्यांच्या कानीं येत होता.

'आजी, घाबरलीस ? तो माणूस मेलेला नव्हता कांहीं.'

आजीचा हात आतां थरथरायचा थांबला होता. बागेंतून तीं दोघं घरांत आलीं तेव्हां त्यांच्या पायाखालचं गवत शहारलं नि सफर-चंद झाडावरून निखळून पडलं. दोघांनीहि त्याचा आवाज ऐकला.

'आजी, आजोबांचा एक बूट फाटलाय ग'

'फाटला तर फाटला. आपण शिवून घेऊं.'

अन मग कांहींहि न बोलतां घराच्या पायऱ्या चढून तीं दोघं आंत आलीं. आतां घर कसं शांत...शांत होतं. प्रकाशानं तुडुंब भरलेलं अन बाहेर रात्रहि कशी मंद, प्रसन्न पसरली होती. • • •








*तिचें नितांत प्रेम हें तिला साक्षात जीवन होतें. त्यासाठीं तिनें मरणप्राय दु:ख सहन केलें; पण माघार घेतली नाहीं...*

*थायलंडचे श्रेष्ठ कथाकार*

## धेप महापॉर्य

*यांच्या सुरस कथेचा*

## शामराव निळकंठ ओक

*यांनीं केलेला सरस अनुवाद*

स्पेशल वॉर्ड मधला पेशण्ट सुमारें सत्तावीस वर्षांचा एक तरूण होता; बांध्यानें मुद्दढ, दिसायला देखणा, सुबुद्ध, नीटनेटके कपडे केलेला. सुसंस्कृत समाजाचा सराव असल्यासारखें त्यानें उठून प्रतिष्ठितपणें आम्हाला अभिवादन केलें. नेहमींचा परिचयविधी झाल्यावर तो अनिश्चितपणें माझ्याकडे पहात मुग्ध राहिला त्यामुळें मला जरा अस्वस्थपणा वाटला. 'तुम्हीं कधीं चुकेतला राहिला असाल ?' मी बोलणें सुरूं करण्यासाठीं म्हणालो.

'नाहीं, तिथं फार दिवस नाहीं. मी बरेंच वर्षं राहिलो, ते पायामधें ताइ म्वांगला.

'ताइ म्वांग म्हणजे पुष्कळशा खाणींच्या प्रदेशाना एक नाक्याचं ठिकाण, तिथं राहण्यात गम्मत असेल ?'

'दुर्गति होती, रौरव होता, '

मीं चपापलो " कां इतर ठिकाणीं नाहींत अशा गोष्टी तिथें नव्हत्या ? उदाहरणार्थ हदजाईसारख्या इतर ठिकाणीं नसलेल्या ? "

'हदजाई आणि तसल्या इतर ठिकाणीं बाया होत्या, पिणं होतं, जुगार होता, पण ताइ म्वांगला चांपून होती, सुसरी आणि लोखंडी साखळदंड होते. '

'मला समजलं नाहीं. चांपून, सुसरी नी साखळदंड यांचा तुम्ही म्हणालांत त्या तीन व्यसनांशीं काय संबंध ? '

त्याला मीं बोलायला लावलें होतें. त्याची हकीकत शब्दांचा पूर आल्यासारखी सुरू झाली—जणुं आधीं शंभर वेळा पुन्हा पुन्हा सांगून तोंडपाठ झाल्यासारखी. सर्व सांगेपर्यंत त्याची मुद्रा निर्विकार आणि दृष्टि सांगत असलेल्या घटनांवर खिळल्यासारखी निश्चल होती. श्वास घेण्यापुरताच तो मधूनमधून थांबत होता. त्यानें सुरुवात केली. 'माझे वडील पांगंगाचे प्रांताधिकारी होते. बांकोकच्या फॅशनेबल बोर्डिंगस्कूलमध्यें माझें शिक्षण झालें. मीं १६ वर्षांचा झालों तेव्हां थोडा बेफाम झालो होतो. वडलांनीं तारेनें मला पांगंगाला बोलावून घेतलें व नंतर पेनांग येथें शाळेंत ठेवलें. पांच वर्षं तेथें राहून मीं शाळेचा शिक्षणक्रम पुरा केला, त्याच वेळीं वडील सेवानिवृत्त झाले. परकीयांच्या आर्थिक जबरदस्तीतून मुक्त होण्यासाठीं आम्हीं थाई लोकांनीं कांहींतरी केलें पाहिजे अशा विचारसरणीच्या लोकांपैकीं ते होते. ते नेहमीं सरकारी नोकरीपेक्षां व्यापारांत लक्ष घालावं असं मला सांगत, आणि त्यांच्या म्हणण्याप्रमाणें करण्यांत मलाही अवघड वाटत नव्हतें, कारण तें माझ्याही स्वभावाला मानवत होते. निवृत्तीनंतर वडील जेव्हां बांकोकला परत आले तेव्हां मीं त्यांच्यापासून वेगळा होऊन पांगंगा येथेंच एका ऑस्ट्रेलियन खाण कंपनीत कारकूनी नोकरी धरली. माझा थोडा स्वैर जीवनक्रम आणि इकडचे तिकडचें शिक्षण, हे गुण या नोकरीला उपकारकच ठरले, कारण मला मलेय, इंग्लिश, हलाम, इंग्लिश आणि थाय इतक्या भाषा बोलता येत




होत्या. मला २०० बाहत पगार होता. वडलांजवळ बांकोकला राहिलो असतो तर इतका पगार मला स्वप्नांत देखील मिळाला नसता. तरी पण ऑस्ट्रेलियन कंपनीत मीं दोनच वर्षे राहिलो. 'यूकॉन गोल्ड माइनिंग कंपनी' नांवाच्या एका अमेरिकन कंपनीला असा एक मनुष्य हवा होता कीं ज्याला आशियाई कामगार आटोक्यांत ठेवतां येतील, त्याचप्रमाणें सरकारी अधिकाऱ्यांशीं जरूर तेव्हां कंपनीचा संपर्कही जुळवून देतां येईल. मी अर्ज करून ती नोकरी मिळवली आणि मला महिना ४०० बाहत पगार सुरू झाला. त्याचप्रमाणें मॅनेजरनें बांधकामांची आणि इतर कंत्राटाचीं कामें माझ्या हाताखालीं दिलीं आणि लौकरच माझी आवक महिना जवळ जवळ ८०० बाहत होऊं लागली.

'ही मिळकत जरी भरपूर होती तरी मला महिना अखेरीपर्यंत पैसे पुरत नसत. त्यांत कांहींच आश्चर्य नव्हतें, कारण त्या भागांत जेवढी म्हणून व्यसनें होतीं त्या सर्वांचा दर्दी म्हणून माझी कीर्ति होती. बाया, दारू आणि जुगार जेथें जेथें असतील तेथें तेथें मी नेहमीं आघाडीवर होतों; इतर गोष्टींतही मीं सर्वांच्या पुढें होतों, मीं कुणाचा शिष्टपणा चालूं देत नसे. नेहमीं मी पुढारी, अनुयायी कधी नाहीं. आणि ते मला चांगले जमत होतें. कुठल्याही मंडळींत मला सहज मिसळतां येई, मग ती थाय असो, कीं परदेशी. आणि माझ्या पैशांखातर सगळ्यांची दारं माझ्यासाठीं उघडीं होतीं.

'ताइ म्वांगमधले वेगवेगळे क्लब आणि तिथले कुतूहलपूर्ण कॅफांचे अड्डे अशा ठिकाणीं मीं वेळ घालवीत होतो.'

तो थोडा थांबला, भेदरल्यासारखें त्यानें आपल्या हातांकडे पाहिलें आणि तो पुढे बोलूं लागला.

'कंपनीची मुख्य कचेरी नदीच्या मुखापाशीं होती. तेथून ताइ म्वांगला जायला दोन मार्ग होते. एक नदीतून वर पैलतीराला तकुआपा-तुंगमाप्रू रस्ता लागेपर्यंत बोटीतून जायचें, तेथून बसनें पुन्हा नदीच्या मुखाच्या दिशेनें ताइ म्वांगला पोहोचायचें. यांत वेळ फार लागायचा. पांच सहा तास बोटीत ताटकळत बसायचें, आणि नंतर बस मिळण्याची शाश्वती नाहीं, आणि ती केव्हां मिळेल त्याचा भरंवसा नाहीं.

दुसरा मार्ग होता कीं एक बोट ठरवून नदी मुखापाशीं पार करायची आणि तेथून अरण्यांतून ताइ म्वांगला जायचें. हें करायला सुमारें तीन तास लागायचे. त्या प्रकारच्या प्रवासात बिकट अडचणी पुष्कळ, पाउल वाट पक्की माहीत असल्याखेरीज रस्ता चुकण्याची भीति, आणि नदीच्या त्या भागांत सुसरी होत्या, मीं कधीं पाहिल्या नव्हत्या इतक्या भयंकर सुसरी. माझे वडील जेव्हां नाकोर्न श्रीतम्मराजचे प्रांताधिकारी होते तेव्हां त्यांच्याबरोबर मीं सुसरींच्या शिकारी पाहायला जात असे, पाकनामुर विभागातील सुसरींबद्दल ख्याति होती, पण आमच्या खाणींच्या आसपासच्या नदींतल्या सुसरींपुढें त्या कांहींच नव्हत. इथें बोटींतल्या माणसांवर देखील सुसरी उडी घालीत.

'मीं कंपनीची बोट घेऊन जात असे व पलीकडल्या तीराला पोहोचतांच जंगलामधून जवळचा रस्ता धेई. मला पाउलवाटा चांगल्या ओळखीच्या झाल्या होत्या, पण मीं शक्य तोंवर अंधार पडायच्या आंत जंगलाच्या बाहेर पडत असें, कारण वाघाचीं पावलेंही जंगलांत मधूनमधून दिसत.

'ताइ म्वांगला मीं लोकप्रिय झालों, एक ठळक व्यक्ति, म्हणायला हरकत नाहीं. त्यामुळेंच एका महत्त्वाच्या व्यक्तीशीं माझा झगडा होण्याचा प्रसंग उद्‌भवला. तो भूकेतचा होता, तावकाए सून, एक श्रीमंत चिनी व्यापारी आणि त्या विभागातला सगळ्यांत बडा आसामी.

'तावकाए सून हा 'बडे भाई सून' म्हणून भूकेत आणि आसपासच्या विभागांत प्रसिद्ध होता. त्यातल्यात तकुआतुंग, तकुआपा, पांगंगा, कोकलोथ आणि तुंगमनाव या परिसरात त्याचे वजन विशेष होतें. कुठलाही कज्जा आधीं बडेभाईकडे जायचा. मग पाहाचलाच तर कोर्टात जायचा. बडेबडे सरकारी अधिकारी त्याचा पाहुणचार घेत, त्याहूनही मोठीं प्रस्थें त्याच्या मोटारींतून प्रवास करीत.

'पण मीही काहीं त्याच्यासारख्यापुढें नमणारा नव्हतां. मीं त्याच्या राज्यात हालचाल करीत होता, केव्हांतरी दोघांमध्यें बलाबलाचा शहानिशा होणार हें ठरल्यासारखेंच होतें.'

तो दम घ्यायला थांबला, पण क्षणभरच. त्यानें एकदम विचारलें.

'तुम्हांला चांपून माहीत आहे ?' मीं त्याच्या हकीकतीकडे लक्ष देत होतो, मधेंच या प्रश्नानें मीं दचकलो–थोडी भीति वाटली, अरे बापरे, डॉक्टर या पेशण्टजवळ मला एकट्याला सोडून गेला आहे खरा, पण मीं सुखरूप आहे का ? मीं चटकन् उत्तर दिलें.

'मीं ऐकलं आहे त्याच्याबद्दल, पण प्रत्यक्ष पाहिलं नाहीं कधी' बोलण्यासाठीं म्हणून म्हणालों.

'बाकोकला तें क्वचित दिसतं, पण दक्षिणेकडच्या प्रांतात, विशेषतः ताइ म्वांगच्या भोंवतालीं तें सर्वत्र दिसतं. चंपक जातीपैच एक फूल, थोडसं चाफ्यासारखं दिसतं, पण त्यात कळ्यांभोंवतीं एक मखमली पाकळी असते. फूल उमलतं तेव्हा आधी ती पाकळी उघडते आणि मग मुख्य फुलाच्या पाकळ्या उघडून वास सुटतो. पाकळ्या भेणासारख्या, जाड कडकडीत असतात. चाफ्यासारख्या त्या कोमेजत नाहीत. चांपूनचें फूल एकदा उमलल्यानंतर त्याचा दरवळ कित्येक






दिवस बाकीच्या फुलांचे वास येऊं देत नाहीं, इतका तो प्रबळ व हट्टी वास असतो.

"कट्टर चिनी वळणाच्या सूनने आपल्या एकुलत्या एक मुलीला या फुलाचें नांव द्यावें हें नवल नाहीं कां? चांपू एकोणिसाव्या वर्षी चमकदार, डोळ्यांत भरण्यासारखी मुलगी होती.' चांपून फुलाला शोभतील अशाच तिच्या लहरीही होत्या, त्या नेहमीं बदलणाऱ्या आणि चांपूने फुलाच्या गंधासारख्याच त्या हृदयाला पोहोचणाऱ्या. खरोखरच पुरुषाचें मन आधीन करून घेऊन हवें ते करायला लावणारी आणि स्वतः मात्र दाद न देणारी ती होती. एकदां तिनें निश्चय केला कीं मग तो कशानेंही बदलायचा नाहीं आणि तिला हवं ते करायला कुणीही आडवूं शकायचें नाहीं.

१२ वर्षांची होईपर्यंत चांपून भूकेतला शाळेत जात होती. तिच्या बापाला वाटलें कीं चांगल्या घरच्या चिनी मुलीसारखें तिनें आतां घरीं राहावें. पण चांपून तेव्हां चौथीत होती आणि थाइ मुलींप्रमाणें तिनें इतकें दिवस पुरेसें स्वातंत्र्य भोगलें होतें, तेव्हां घरीं बसून जन्म काढण्याच्या बापाच्या योजनेविरुद्ध तिनें बंड केलें.

सून ही कांहीं कमी खंबिर नव्हता, पण त्यानें तडजोड पत्करली व चांपूला पेनांग येथें कॉनव्हेण्टमध्यें शिक्षण चालू ठेवण्यास अनुमति दिली. त्याला चांपूने थाय जीवनांत समरस व्हायला नको होतें. थाय माणसाशीं तिचें लग्न व्हायला नको होतें."

शाळा संपवून घरीं आल्यावर थोड्याच दिवसांत चांपूचा बापाशीं खटका उडाला. मुलीला पिंजऱ्यांत ठेवण्याची कल्पना तावकाए सूनच्या डोक्यांतून जाईना, आणि चांपून तसली परिस्थिति सहन करणारी नव्हती. ती थोडीशी नमतें घेई, उदाहरणार्थ चिनी रूढीला अनुसरून बायकामाणसानें घराच्या पुढल्या भागांत जायचें नाहीं हें तिनें कबूल केलें, पण जर तिनें कुठें जायचें हें ठरवलें तर ती बापाची इच्छा आड येऊं देत नसे.

"तावकाए सूनचें घर गांवाबाहेर होतें आणि मागील दाराबाहेर जंगलाची कड येऊन भिडली होती. चांपूला बायकांना पिंजऱ्यांत कोंडणें आवडत नव्हतें तरी चिनी घरांतून दर्शनी भागांत मुलींनी कधीं दिसायचें नाहीं हा प्रघात तिनें मोडला नाहीं. घरातल्या घरांत ती घरकामांत लक्ष घाली, कांहीं कलाकुसरीचें काम करी, बरेंच वाचीत राही. पेनांग व बांकोकहून तीं पुस्तकें मागवून घेत असे व जंगलांत फेरफटका करण्याचीही तिला आवडत होती."

"आमची भेट योगायोगानें झाली आणि जणुं ब्रह्मदेवानें पूर्वीच ठरवून टेवल्याप्रमाणें आम्हीं परस्परांच्या प्रेमपाशांत पडलो. आमचें प्रेम आकस्मिक, प्रबल आणि गाढ होतें. तें गुप्त ठेवायला पाहिजे म्हणून व तें हताश आहे या जाणिवेनें तें अधिकच तीव्र होतें. आम्हाला पूर्णपणें ठाऊक होतें कीं जगांतला आपला सर्वांत मोठा शत्रु मानून माझा द्वेष करणाऱ्या तावकाए सूनला मुलीचें लग्न माझ्याशीं होण्यापेक्षां ती मेलेली पत्करली असती."

"चांपून माझ्यावर मनःपूर्वक, नितांत प्रेम करीत होती, हें प्रेम तिला साक्षात जीवन होतें, पण आमच्या प्रीतीची फलश्रुति होण्याची तिला कांहीं आशा दिसत नव्हती. माझ्याबरोबर पळून जायला तिनें नकार दिला. तिचें शिक्षण आणि संस्कार आड आले. मी तिच्यावर निरपेक्षपूर्वक प्रेम करीत होतो, आणि तिचा अवाजवी फायदा न घेण्याची खबरदारी ठेवीत होतो. आम्हीं रूढीच्या मर्यादा पाळीत होतो आणि तळमळीचें सारें दुःख सोसण्याचा चांपूनचा निर्धार होता."

'ताइम्वांग गांव लहान, तेथें फार दिवस कांहीं गुपित टिकणें अशक्य, विशेषतः आमच्या प्रेमप्रकरणासारखें गुपित. गांवभर बोभाटा झाला आणि ही गोष्ट चांपूच्या बापाच्या कानावर गेली.'

'एकाएकीं आमच्या भेटी बंद पडल्या. पुन्हा ती मला भेटेच ना. ती घरांतच आहे, तिला हलवून कोठे नेलेली नाहीं हें मला माहीत होतें कारण मीं पाळतीवर माझीं माणसें ठेवलीं होतीं. चांपूने पत्रव्यवहार करावा म्हणून मीं हरप्रयत्न केले. माझें पत्र तिला पोहोचविणाराला तीनशें आणि तिचा जबाब घेऊन येणाराला पांचशे अशीं बक्षिसें लावलीं. पुष्कळांनीं कोशीस केली, कोणीही यशस्वी झाला नाहीं. कित्येकांना झळ मात्र लागली, चमत्कारिक आपत्ती त्यांच्यावर आल्या. तावकाए सूनचा त्या मुलखावर कडक अंमल होता.'

'त्या दिवसांत त्याच्यामाझ्यात अदबीच्या नियमानुसार बोलणें-चालणें होतें. वरवर आम्ही एकमेकांशीं सभ्यपणें वागत होतो पण मनांतून दोघांनींही ओळखले होतें कीं एकमेकांना दुसऱ्याबद्दल काय वाटतें! चांपूला फटके मारून हाल करून कोंडून ठेवलेलें होतें तिच्या बापाच्या जंगी काळोखी वाड्यांत. मला भूकेतपासून बरेच दिवस दूर ठेवण्यांत आलें व त्या विभागांत वेगवेगळ्या कंपूतून याबद्दल चर्चा झाली. अखेर कांहीं मित्रांनीं एक मोटरबोट केली, आणि तेच माझ्याकडे खुशालीखुशालीच्या पार्टीची तयारी घेऊन दाखल झाले.'

'ती पार्टी आठवण राहण्यासारखी झाली. भुकेत ज्या प्रकारच्या विलासोत्सवांसाठीं प्रसिद्ध आहे त्या प्रकारची रंगेल रात्र, मसालेदार पक्वान्नें, उंची दारू आणि सुंदर स्त्रिया. प्रत्येक पुरुषाच्या सोबतीसाठीं एक तरुणी होती. एकीला कोणी माझ्याकडे आणलें. तिचें नांव अनिता. थोडी पोर्तुगीज छटा दाखवणारी एक फिलिपिना. दिसायला आईच होती पण तिचा बांधा तिचें गोरें रक्त सुचवीत होता. तिच्या हालचाली डौलदार होत्या.'

'तीन दिवस आणि तीन रात्री माझी मित्रमंडळी (आणि मीं) त्या बोटीवर होतो, ते मला रानोंगला चल म्हणत होते, पण मला महत्त्वाचें काम होतें, मला त्यांच्याबरोबर जातां आलें नाहीं. ते मौज करीत पुढच्या मुक्कामाला गेले, पण अनिताला मागे ठेवून गेले. पांचसहा दिवसांनीं ते परत पेनांगच्या वाटेवर येतांना अनिताला पुन्हां बरोबर घेऊन जाणार होते. अनिताला मीं सुचवलें कीं तूंही मंडळीबरोबर रानोंगला जा, पण ती आपण होऊन मजकडे राहिली.'

'मित्रमंडळी वाटेला लागतांच मीं अनिताला माझ्या बंगल्यावर आणलें. आमचा एकमेकांशीं परकेपणा, तो आम्हाला जास्तच खुलवीत होता. माझें घर खरोखरच विलासमंदिर झालें—इष्काचा महाल.

'अनिता आपल्या मित्रमंडळींबरोबर परत जाण्याच्या आदल्या सायंकाळीं आम्हाला समुद्रकिनारीं राहणाऱ्या कंपनीच्या इंजिनिअर्सनीं जेवायला बोलावलें होतें. जेवण झाल्यावर आम्ही थोडा नाच केला, ते लोक खूष झाले. जवळ जवळ पहाटेपर्यंत वेळ मजेत गेला.

'एरवीं माझी झोंप सावध असते, पण झोंप लागायला बराच वेळ लागतो. यावेळीं मी उशीला डोकें टेंकताक्षणींच मला गाढ झोंप लागली.






'दरवाजा करकरल्याचा आवाज आला, तेव्हां उजाडूं लागलें होतें, मी लगेच जागा झालो, आणि डोळे उघडले. तेव्हां उघड्या दरवाज्यातून उगवत्या सूर्याचें उन माझ्या तोंडावर आलें. दरवाज्यांत अस्पष्ट हालचाल होत होती कोणी माणूस आहे कीं काय तें नक्की दिसत नव्हतें, उशीवरून डोकें उचलून मीं डोळे चोळून पाहिलें.

'अरे देवा ! हें स्वप्न तर नव्हे ! कां मी वेडा झालो, असें वाटलें. अजूनही मीं डोळे मिटले कीं डोळ्यापुढें तें दृश्य येतें. ती चांपून होती आणि तिच्या अंगावर एक सुत देखील नव्हतें. तिचा दाट काळाभोर केशपाश तिच्या खांद्यावर रुळत होता. तो भिजलेला होता. बोटभर जाडीची एक लोखंडी सांखळी तिच्या पायाला विळखे देऊन कमरेभोवतीं बांधली होती.

'ती आकृति माझ्यापुढें उभी राहिली आणि आम्ही एकमेकां-कडे पाहात राहिलो, कांहीं न बोलतां. तिची नजर माझ्यावरून हललेली मी पाहिली. तिच्या नजरेनें माझ्या शेजारीं मला रेलून झोंपी गेलेली अनिता पाहिली.

'ती कांहीं तरी बोलेल म्हणून मी वाट पाहिली. शेवटीं तिचा मुकेपणा असह्य झाला. मीं हातांनी डोळे झांकून घेतले. डोळे उघडून पाहिलें तो चांपूं गेली होती.'

चांपूंने बापाकडे कबूल केलें होतें कीं तिचें व नय अमनुई यांचें परस्परांवर प्रेम आहे व एकमेकांच्या गुप्त भेटीही झाल्या आहेत. तिनें आश्वासन दिलें होतें कीं प्रियकरानें तिच्याशीं केवळ दाक्षिण्याचीच वर्तणूक ठेवली आहे. कधीं अतिप्रसंग केला नाहीं. पण सूनसारख्या माणसाच्या समजेपलीकडची ही गोष्ट होती. त्याच्या दृष्टीनें बायका पुरुषांच्या होणाऱ्या चोरून भेटी एकाच हेतूसाठीं होत असतात. घरात स्वतः त्याच्या सहा रखेल्या होत्या.

आपल्या मुलीशीं गुप्त भेटी करून नय अमनुई आपला शत्रू झाला, वर्षानुवर्षें ज्या मुलखावर सुलतानी गाजवली त्यांतच आपल्या वर्चस्वाला न जुमानणारा हा निघाला, ही सूनची खात्री झाली. मुलगीही बेइमान निघाली—बापाचा उभा वैरी असलेल्या माणसाशीं प्रेम करण्याइतकी. तिचें अक्षरही ऐकायला तो तयार नव्हता, एक जळका ओंडका घेऊन त्यानें तो तिला मारून टाकायला फेंकला. तिनें तो चुकवून जीव बचावला, पण मग मार मात्र अतिशय खावा लागला.

आवाज शेजाऱ्यापाजाऱ्यांना ऐकू गेले तर ते गोळा होतील म्हणून चांपूननें आरडाओरडा केला नाहीं, फार तर कण्हून आपल्या यातनांना आवाज दिला. तावकाए सून जेव्हां मारून मारून थकला तेव्हां जमिनीवरून उठून चांपूनें पुन्हां आपण निर्दोष आहोत हें सांगितलें आणि जाऊन अमनुईच्या स्वाधीन होण्याचा मनांत निश्चय केला. आठवड्याभरांतच ती घराबाहेर पडली, पण तिला निसटता आलें नाहीं. सूनचा दरारा साऱ्या घरादारावर होता. बायका, बाया, मुलगे, नोकर, चाकर सर्वांना त्यानें समज दिली होती कीं चांपू जर घरातून गेली तर एकजात सर्वांना चाबकाचे फटके बसतील. त्यामुळें चांपूचे बंदिवासातून सुटका करून घेण्याचे प्रयत्न फुकट गेले. दरवेळीं सर्व परिवार तिला अडवायला यायचा, सूनला बोलावणें जायचें, पुन्हां मार बसून बंदिवास चालू. तरीही पळून जाण्याची खटपट थांबेना म्हणून अखेर सूननें तिला तिच्या खोलीत एका खांबाला सांखळीनें









अनुक्रमणिका



## जेव्हां आकाशींचा चंद्र

जेव्हां आकाशींचा चंद्र
अमावास्येच्या गडद काळोखांत
आपल्या चेहऱ्यावरचा कलंक
'प्युमिस स्टोन'नें घासत बसतो

जेव्हां मृत समुद्र
आपल्या पोटांतले अपक्व वमन
घुसळित अमृतमंथनाची साय
फेसाळून वर आणतो

जेव्हां मध्यान्हरात्रीचे जळणारें
खत्रूड लाकडी प्रेत
आपल्या डोळ्यांच्या खोबणींतून
शांतपणें आकाशतारका मोजत असतें

जेव्हां बोडका खाटिक
रसाळपणें कोंकराच्या मानेवर
चरचरित सुरा चालवित
गझल गात असतो

जेव्हां नागडा भंगी
उघड्या गटारांतील कुबट घाण
काठीनें ढवळत अथांग सागरांतील
माशांना अन्न पुरवित असतो

तेव्हां तोटक्या दाढीच्या
अतैल अस्नात नवकवीच्या
बुटक्या कुजट मनांत प्रतिभेचा सैतान
पाल्याचे करपट ढेकर देत थैमान घालतो

आणि मग निर्माण होतें एका
* 'गांडू'ळाचे अशरिर बेसूर गाऱ्हाणें
* आजच्या नवकवींचा आवडता शब्द

—शां. शं. रेगे

बांधून ठेवलें. रात्रीं तिला हालचाल सोपी व्हावी म्हणून सांखळी खांबाची काढून तिच्या पायभोवती बांधायची सवलत त्यानें दिली होती. इतकें असूनही चांपूंन पळून जाण्याचा प्रयत्न सोडीत नाहीं हें पाहून त्यानें तिच्या एका सावत्र आईला फर्मावलें कीं, रोज रात्रीं निजण्याआधां शांपूंच्या अंगावरचा कपडान् कपडा काढून न्यावा. ही युक्ति सर्वांत खात्रीची असा त्याला विश्वास होता. त्यानें शपथही घेतली, कीं शांपूनचें म्हणणें मरेपर्यंत मान्य होणें शक्य नाहीं, तावेल ते होवो. पण एके दिवशीं सकाळीं चांपूंच्या खोलीचें कुलूप काढून पाहतो तो खोली रिकामीं. चांपूंन निसटून गेली होती.

मीं माझ्या शेज घराच्या दारांत पाहिली ती खरोखरीचीच चांपून होती. ती दृष्टीआड झाली तेव्हांच तें माझ्या लक्षांत आलें. तिच्या आकृतीचा तो भास झाला नव्हता, ती तीच स्वत: होती. मीं उडी मारून बाहेर धाव घेतली, व्हरांड्यातून तिचें नांव घेऊन हांका मारल्या, 'चांपून चांपून' म्हणून ओरडत नदी किनाऱ्यापर्यंत धांवत गेलो, पण तिची खूणदेखील कुठें दिसली नाहीं. दोन्हीं किनाऱ्यांवरून तिचें नांव पुकारीत हिंडत सूर्य डोईवर येईपर्यंत शोध केला. ती माझ्यापासून लपत असेल हें माझ्या ध्यानांत आलें.

'मी धावत आमच्या कामगारांच्या वस्तीकडे जाऊन २० माणसें जमा केलीं, त्यांना एक नदीकाठापर्यंत पोहोचेल अशी आडवी रांग करायला लावलीं व प्रवाहाच्या विरुद्ध दिशेला मजल करीत नदी किनाऱ्याची दिवेलागणीपर्यंत तपासणी केली, कांहीं थांगपत्ता लागला नाहीं. म्हणून रात्रीचे आम्हीं परतून आलो. मीं बंगल्यांत परत न जातां ताइ म्वांगला जाण्यास निघालो. चांपूं आपल्या घरीं सुरक्षित आहे हे तावकाए सूनच्या तोंडून ऐकण्यासाठीं मीं त्याच्या पायाशीं लोळण घ्यायला तयार होतो. ताइ म्वांगला पोहोचल्यावर मला माझ्या एका हस्तकानें सांगितलें कीं चांपू घरांत नाहीं. तरीही मी दांती तृण धरून गेल्यासारखा सूनकडे गेलो, पण तो पशुसारखा बोलला. माझ्या तोंडावर हंसून तो म्हणाला कीं 'चांपूं परत येण्याइतकी बेशरम निघाली तर तिला मरेपर्यंत फटके मारून तिचा मुडदा पेटीत घालून तुझ्याकडे पाठवीन..'

'तेव्हां मीं परत घरीं गेलो व ३० लोक जमविले. त्यांच्या दोन टोळ्या करून नदीच्या दोन्ही तीरावरून आडव्या सांखळ्या करून वर जात राहायला लावल्या. नदीकाठापेक्षां चांपून जास्त आड रस्त्याला गेली नसेल अशी माझी समजूत होती. कुठें अरुंद पात्रांतून तिनें नदी ओलांडलीही असेल. ९ वाजतां आम्हीं निघालो, दोन्ही तीरांना दोन टोळ्या आणि मधल्या नदीतून बोटीनें मीं स्वत:.

'चोवीसएक तास माझी धावपळ अखंड चालू होती. कांहीं खाल्ल्याची आठवण नाहीं, ब्रॅण्डीचे चार पांच वेळा घोट घेतले. माझा डोळा लागला असावा, पण बोट किनाऱ्याला जाऊन धडकली तेव्हां मीं दचकून जागा झालों आणि काय झालें म्हणून विचारलें, एका नावाड्यानें हातानें दाखविलें....

'सुसरी माणूस कसें खातात माहीत आहे तुम्हांला ?''

मी म्हणालो, नाहीं.

'कितीही मोठी सुसर झाली तरी ही माणसाचं शरीर सबंध गिळूं शकत नाहीं. तोंड मोठं असलं तरी तुकडे करायला उपयोगी नाहीं, आणि पाय थिटे असल्यामुळें फाडायला कामीं येत नाहींत. तिला मुडदा किनाऱ्यालाच आणावा लागतो. त्याचा एक भाग तोंडांत धरून सुसर मुडदा झाडावर आपटते, आणि जे भाग तुटून पडतील ते खाते, पुन्हा झाडावर आपटते; पुन्हा खाते, शेवटी सगळ्या मुडद्याच्या चिंध्या होऊन जातात.'

येथें पेशन्ट बोलायचा थांबला. दूर कुठेतरी दृष्टि लावून तो स्वतःच्या गुप्त विचारांत गुंग झाला होता. या निःशब्दपणानें माझी जरा चलबिचल झाली. मीं विचारलें,

'त्या नावाड्याला चांपून सांपडली होती ?'

'नाहीं' नय अमनुई सावकाश म्हणाला, 'त्यानें पाहिला तो गुडघ्यापाशीं तुटलेला एक पाय, ज्याच्याभोंवतीं लोखंडी सांखळी बांधली होती. त्या सांखळीनेंच झाडाच्या अगदीं खालच्या फांदीवर तो पाय लटकत होता....'

● ● ●

अनुक्रमणिका

*वाघ हा कांहीं स्नेहशील प्राणी नाहीं. पण जेव्हां मनुष्याचें वाघांत रूपांतर होतें तेव्हां काय बरें घडत असेल ?*

*......माणसाचा वाघ झाल्यावर जें जें कांहीं घडणं शक्य आहे त्याचीं अंगावर शहारे उठविणारी ही सत्यकथा. अशा कथा आजहि ब्रह्मदेशांत घडतात म्हणे.*

*ब्रह्मदेशांतील आजचे आघाडीचे कथा लेखक श्री.* **यू. विन** *यानीं लिहिलेल्या कथेचा* **श्रीकृष्ण ठाकूर** *यानीं केलेला अनुवाद.*

# तमांथीचा वाघ

स्टँड हॉटेल हे रंगूनचं एक महान आकर्षण आहे. प्रशस्त व्हरांडा आणि आजूबाजूची भरपूर मोकळी जागा हें तिथलं वैशिष्टय आहेच पण शिवाय तिथं जर तुम्हीं पुष्कळ दिवस राहिलांत तर ब्रम्हदेशांत काय चाललं आहे, कोणकोणत्या घडामोडी होताहेत याची इत्यंभूत माहिती तुम्हाला तिथें मिळते.

मी तमांथीं विषयी प्रथम ऐकलं ते यू थान-यांजकडून. ब्रम्हदेशांतील जंगलांत लाकडाचा व्यापार करून भरपूर पैसा मिळवून उत्तर आयुष्यांत रंगूनमध्यें सुखासमाधानानें ते दिवस घालवीत होते.

यू थान यानीं मला हाताला धरून व्हरांड्यांत नेलं. पंख्याखालची निवांत जागा पाहिली व तिथं आम्ही दोघेजण बसलों. यू थान यांच्या तुंदिलतनुवरून घामाच्या धारा वहात होत्या. मी आतां लैकर ब्रम्हदेशांतील चिंडविन भागांत जाणार होतो हें कळतांच मला तिकडे घडलेली एक सत्यकथा सांगण्याचं त्यानीं कबूल केलं होतं. ती कथा सांगण्यास ते आतां अधीर झाल्यासारखे दिसत होते.

“आतां तिथं उष्मा वाढेल.—” यू थान म्हणाले, “त्या तिथल्या जागेची मला संपूर्ण माहिती आहे. आणि तिथं तुम्हीं जाणारच आहांत तर सोबत एक बंदूक असावी. तिथं तुम्हाला वाघ आढळतील.”

माझं पुष्कळसं आयुष्य जंगलांत गेल्यामुळे रानटी श्वापदं-जीवजिवाणू यांचा मला चांगलाच परिचय आहे. वाघाला जखमी केल्याशिवाय अगर मानवी रक्ताची त्याला चटक लागल्याशिवाय तो सहसा माणसावर चाल करून जात नाहीं. मी हें यु थान यांना सांगितले, तेव्हां ते म्हणाले,

“तुमचं हें म्हणणं सर्वसामान्य वाघांविषयीं खरं आहे. पण तमांथीच्या वाघांविषयीं नाहीं. कारण तमांथींचे वाघ हे सर्वसामान्य वाघ नव्हतेच मुळीं. तिथले वाघ हे नर-भक्षक असतात. त्या वाघांनीं मानवाची बुद्धि असते आणि—आणि तिथले कांहीं वाघ हे तर पूर्वीचे मनुष्यच असतात”

यु थान यांच्या म्हणण्याकडे मी फारसं लक्ष दिलंहि नसतं. पण त्याचं तें शेवटचं वाक्य माझ्या कानांत घर करून राहिलं. तेवढ्यांत खुर्ची पुढे ओढून माझ्या कानाकडे आपलं तोंड करीत यू थान म्हणाले, “तुम्ही तिकडे जातच आहांत म्हणून सुरक्षिततेच्या दृष्टीनें मुद्दाम तुम्हाला मी हें सांगतो—.”

यु थाननीं मला जें सांगितले तें मी कधीच विसरणार नाहीं. प्रीतीच्या भावनेनं मानवी मनांत प्रवेश केल्यावर काय काय घडूं शकतं—

तीस वर्षांपूर्वी रंगूनमधल्या एका व्यापाऱ्याला त्याच्या तमांथी मधील स्नेह्यानं व्यापार-उदीमासाठीं तमांथीला यायचं आमंत्रण दिलं. तमांथीमधून बांबू, साग आणि इतर जंगली लाकडं गोळा करून तीं रंगूनला विकून लाकडाचे व्यापारी गब्बर होत असत. रंगूनमधला हा व्यापारी पैशाच्या लोभाने तमांथीला गेला. त्याच्याबरोबर त्याचं कुटुंब गेलं. त्याच्या कुटुंबांत त्याची १८ वर्षं वयाची देखणी मुलगी होती, मा-हिआ-शिन. त्या खेड्यांतील तरुणांचं ती लक्ष्य बनली.

मा-हिआ-शिनचा बाप ज्या कंपनीत होता, त्या कंपनीच्या भागीदाराचा मुलगा मॅांग सो-



हा मा-हिआ शिनच्या प्रेमांत पडला. ती येण्या-पूर्वी त्या खेड्यांतील इतर तरुणींविषयीं पूर्वी त्याला जें वाटे तें आता वाटेनासं झालं. त्या इतर तरुणी त्याला आतां कस्पटासमान वाटूं लागल्या. त्यांचं बोलणं त्याला आतां आवडेना. उलट मा-हिआ-शिनचा आवाज त्याला पॅगोडामधील घंटानादाप्रमाणें मंजूळ वाटे.

मा-हिआ-शिननें प्रथम या तरुणाकडे फारसं लक्ष दिलेंच नाहीं. पण कांहीं दिवसांनंतर एकदां ती पाणवठ्यावर पाणी आणावयास जात असतां काहीं मुलं, तिच्याविषयीं व मॉंग-सो याच्याविषयीं बोलतांना तिला आढळली. ती चिडली, मागें वळली व त्या मुलांमध्यें असलेल्या मॉंग-सो याच्याजवळ येऊन तिनें त्याच्या श्रीमुखांत दिली. तो नेहमी तिच्या मागून फिरत असे. 'कुत्र्यासारखा माझ्यामागून काय फिरतोस?' तिनं त्याला विचारलं.

यानंतर असे प्रसंग वारंवार घडूं लागले. त्यामुळे मॉंग-सो दुःखी आणि अंतर्मुख बनला. मुलाच्या या बदलत्या वृत्तीचं कारण आई-बापानीं जाणून घेतलं व मग तीं रंगूनमध्यें आपल्या मित्राला–त्या मुलीच्या बापाला भेटायला गेली. मा–हिआ–शिन हिचा विवाह आपल्या मुलाशीं करण्याचें सांगण्याला.

त्या श्रीमंत प्रतिष्ठित व्यापाऱ्याला ही गोष्ट आवडली नाहीं. मुलाचा बाप आपला स्नेही असला, भागीदार असला तरी आपल्या दर्जाचा नाही हें शल्य त्याला टोचत होतें. तरी स्पष्ट नकार देऊन आपल्या मित्राला दुखवायची त्याची तयारी नव्हती. त्यानं आपल्या मुलीला बोलावलं व याबाबत तिचं काय म्हणणं आहे तें विचारलं. तेव्हां क्षणाचाहि विचार न करतां ती म्हणाली कीं मॉंग–सो विषयीं तिच्या मनांत कसलाच विचार आलेला नाहीं. तिला त्याच्याविषयीं कांहींहि वाटत नाहीं.

हा नकार कळतांच मुलाचे आईबाप आपल्या धर्मगुरूला भेटले व मुलाचं काय करायचं असं विचारलं. धर्मगुरूंनीं शांतपणें सांगितलें कीं, त्याला धर्मकार्याकडे वळूं द्या.

आतां मॉंग-सोला नेहमी एक नवागत येऊन वारंवार भेटत असे व त्याला सांगत असे, 'ऐहिक सुखं ही क्षणभंगुर असून त्यापायीं नेहमीं दुःखच भोगावं लागतं. खरं सुख—चिरंतन सुख हें फक्त भगवान बुद्धाच्या वचनांचा प्रसार करण्यांतच आहे. त्याविना या जीवनांतील इतर सर्व कांहीं हें अशाश्वत व नश्वर आहे.'

प्रणयानें विद्ध झालेला तो तरुण प्रथम प्रथम त्या वृद्ध धर्मगुरूच्या म्हणण्याकडे लक्षच देत नसे. पण हळूहळूं त्याच्या मनावर थोडथोडा परिणाम होऊं लागला व दोन महिन्यांनंतर त्यानें निश्चय केला कीं आपण तमांथी सोडून बुद्ध–भिक्षू व्हायचं.

ज्या मठामध्यें मॉंग-सोला बुद्ध–भिक्षूच्या शिक्षणासाठीं ठेवलं होतं तो मठ तमांथीपासून फार दूर होता. कारण मॉंग–सो हा तमांथींच्या जितका जवळ राहील तितकी त्याच्या मनाची चलबिचल जास्त वाढत जाईल अशी रास्त भीति त्याच्या गुरूला वाटली.

मॉंग–सोला तिथं नवं नांव देण्यांत आलं. त्याच्या डोक्यावरील सर्व केस काढून टाकण्यांत आले व नेहमीचीं वस्त्रं टाकून त्याऐवजीं केशरी वस्त्रं परिधान करण्यांत आलीं. आपलीं प्रार्थनादि सर्व आन्हिकें आटोपून तो आजूबाजूच्या खेड्यांत भिक्षेसाटीं कटोरा घेऊन हिंडे. त्याच्या गुरूच्या अपेक्षेप्रमाणें त्याच्या मनांतून मा-हिआ-शिनचे विचार निघून गेले. एका वर्षात या शिष्यानें स्वतःवर संपूर्ण ताबा मिळविला. आतां तो परत तमांथीला गेला तरी धोका नाहीं असं त्याच्या गुरूला वाटलं.

आणि तीच महाभयंकर चूक ठरली.

नव बुद्ध भिक्षू मॉंग-सो तमांथीला पोचला न एग्याद्या अगात शक्तीच्या प्रेरणेनें त्याची पावलं मा-हिआ-शिनच्या घराकडे वळलीं.

तिच्या फाटकाकडे तो केशरी वस्त्रं धारण केलेला भिक्षू हातांत कटोरा घेऊन भिक्षेसाठीं उभा होता.

कांहीं वेळानं ती भिक्षा घेऊन आली व त्या कटोरींत तिनं भिक्षा वाढली तेव्हां त्या भिक्षूचा हात थरथरत होता हें कांहीं तिच्या लक्षांत आलं नाहीं. पण भिक्षूच्या मात्र लक्षांत आलं कीं बुद्ध-भिक्षूची दीक्षा घेऊन एक वर्ष दूर राहूनहि आपली प्रीतीच्या तड्डाख्यांतून सुटका झालेली नाहीं. त्या मुलीची अभिलाषा आपला पाठलाग सोडावयास तयार नाहीं.

ही गोष्ट लक्षांत येतांच मॉंग-सो त्याच खेड्यांत रहाणाऱ्या आपल्या एका चुलत्याला भेटायला गेला. त्या खेड्यांतील इतर कांहीं लोकांप्रमाणें हा चुलताहि BlacK Art म्हणतात त्या कलेंत निष्णात होता.

आपलं खरं नांव सांगून त्यानें चुलत्याला आपली ओळख पटविली व आपली व्यथा त्याला निवेदन केली व शेवटी मा-हिआ-शिनचं आपल्यावर प्रेम बसेल असं कांहींतरी करावयास सांगितलं व तें शक्य नसेल तर सूड उगविण्यास मदत करण्यास विनंती केली.

याचवेळीं मा-हिआ शिनचा एक दूरचा आतेभाऊ, रंगूनहून इथें त्यांच्याकडे रहावयास आला होता. एखाद्या छोट्या खेड्यात दोन तरुणांची ओळख होणं ही काहीं मोठी प्रयासाची गोष्ट नव्हे त्या आतेभावाची व मॉंग-सोची लौकर चमैत्री जमली. सहजच इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलतां बोलतां मॉंग-सोला त्या आतेभावाकडून मा-हिआ शिनच्या बारीकसारीक गोष्टी कळत असत. ती काय बोलली, केव्हां हंसली, तिला काय आवडतं वगैरे वगैरे.

ज्यावेळीं मॉंग-सोची तिच्या त्या आतेभावाबरोबर मैत्री वाढत होती त्याचवेळीं मॉंग-सोची जादूटोण्याच्या विद्येंतहि प्रगति होत होती. या बाबतींत त्याला त्याच्या काकांचं सक्रीय सहाय्य होत होतं. मॉंग-सो ज्या पुष्कळशा गोष्टी शिकला त्यापैकीं स्वतःस वाघाच्या स्वरूपांत व्यक्त करणं ही महत्वाची गोष्ट होय. मात्र अद्याप त्याला स्वतःचे मांजरामध्यें रूपांतर करतां येत नव्हतं.

मात्र त्या गरीब मुलीच्या आतेभावाला यांविषीं कशाचीच कल्पना नव्हती. आपला हा भिक्षु-मित्र कोणती नवी विद्या शिकतोय याची ज्याप्रमाणें त्याला कल्पना नव्हती त्याचप्रमाणें तो आपल्या मामेबहिणीची चौकशी हेतुपुरस्सर करतो आहे याचीहि कल्पना नव्हती. भाबडेपणानं त्यानं आपल्या भिक्षु-मित्रास सांगितलं कीं रंगूनमध्यें मा-हिआ-शिनला डुकराचं मांस वारंवार मिळे. तें तिला फार आवडतं पण इथें जंगलांत काहीं तें मिळत नाहीं व तिला त्या मांसाची वारंवार आठवण होते.

आपल्या हृदयस्वामिनीला काय हवय् याची मॉंग-सोला कल्पना आली. तिच्या आतेभावास घेऊन तो जंगलाच्या वाटेनं निघाला. खूप दूर अरण्यांत आल्यावर त्याना एक चढाव लागला. त्या चढावाच्या शेवटी एक वाकलेलं झाड होतं व झाडाखालीं खोल भाग होता. तिथें गेल्यावर मॉंग-सोने त्या तरुणास चढावयास सांगितलें व 'आपण खालीं गेल्यावर काय सांगतों तें ऐक नाहींतर विनाकारण धोक्यांत सांपडशील' असं सांगितलं.

त्या झाडाच्या बरोबर खालीं-खालच्या खोल भागांत मॉंग-सोने एक वर्तुळ काढलं. त्या वर्तुळाचे चार भाग करून त्याला खुणा केल्या. नंतर त्यानें डोक्यावरील वस्त्र व अंगातील जाकीट काढून झाडावर बसलेल्या आपल्या मित्राकडे दिलं व त्याला शेवटच्या सूचना दिल्या. कपडे घेऊन झाडावर बसलेल्या त्या मित्रानं कोणत्याहि निमित्तानं खालीं उतरतां नये व जर का एखादा वाघ त्या वर्तुळांत येऊन उभा राहिला तर त्यावर मॉंग-सोचं डोईचं वस्त्र किंवा जाकीट बरोबर मारलं पाहिजे.

मित्र झाडावर नीट बसल्याची खात्री होतांच मॉंग-सोनं त्या वर्तुळांत उडी मारली. तोंडानं तो कांहींतरी पुटपुटत होता. झाडावरील तरुणानं, तमांथीमधील कांहीं माणसं आपलं वाघात रूपांतर करतात असं ऐकलं होतं पण त्याचा या भाकडकथेवर विश्वास नव्हता. पण आतां प्रत्यक्ष तो हें सारं पहाणार होता-भाग घेत होता. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहूं लागले होते.

मॉंग-सोनें वर्तुळांत उडी मारली आणि त्याच्या शरीराच्या बाह्य भागांत फरक पडूं लागला. त्याचं पुटपुटणं गुरगुरण्यासारखं होऊं लागलं, त्याचे हात पाय, बारीक, लांबट आणि केसाळ होऊं लागले. क्षणार्धात हा सारा बदल घडून आला. आतां त्या झाडाखालील वर्तुळांत एक भयंकर वाघ होता.

पण तो वाघ तिथं काहीं थांबला नाहीं. लांबलांब उड्या मारीत तो जंगलाच्या दिशेनें पळाला आणि मग परत त्या जंगलांत सारं शांत झालं. आतां तिथं कसला आवाज होत असलाच तर तो झाडावरील तरुणाच्या श्वासोश्वासाचा. पुष्कळ वेळ तो तसाच झाडावर चिकटून होता. हूं-चूं कांहींहि न करतां. कांहीं वेळानं त्यांनं डुकराचं ओरडणं-किंचाळणं ऐकलं. थोड्या वेळानं तोहि आवाज बंद झाला आणि मग लौकरच हिरव्या झाडींतून वाघ सावकाशीनं बाहेर आला व झाडाखालील वर्तुळांत येऊन थांबला.

झाडावरील तरुणानं हातातील डोईचं वस्त्र खालीं टाकलं. पण तें वर्तुळांतील वाघाच्या अंगावर न पडतां बाजूला पडलं. वाहत्या वाऱ्याबरोबर तें बाजूला वाहून गेलं होतं. हें पहातांच वाघ गुरगुरला; तेव्हा त्या तरुणानें हातांतील जाकीट गुंडाळी करून व नेम धरून वाघाच्या अंगावर मारलं. तें त्या वाघाच्या अंगावर बसलं आणि परत क्षणार्धात जादू घडली. वाघाचा मनुष्य झाला. तिथल्या मातीवरून मॉंग-सो उठला. जणू काय तो आतां झोपेतूनच उठतो आहे.

मॉंग-सोच्या छातीला रक्त लागलं होतं. पण बाकीच्या वाघाच्या निशाण्या निघून गेल्या होत्या. नंतर ते दोघेहि आंत जंगलांत गेले. तिथें एका रानटी डुकराचं डोकं फोडलेलं त्यांना आढळलं. त्यांनीं तो डुकर तमांथीला नेला व त्यांतील पुष्कळसं मांस मा-हिआ शिनच्या घरीं पाठवून दिलं.

त्यानंतर मॉंग-सोने पुष्कळवेळा मा-हिआ शिनच्या घरीं डुकराचं व इतर रानटी जनावरांचं मांस पाठवून दिलं. त्याचं तिच्यावर इतकं प्रेम होतं कीं ती मारीत असलेले टोमणे कळूनहि तो तिला किंवा तिच्या घरच्या माणसांना त्रास द्यायला, संकटांत टाकायला तयार होईना. आपल्या नशिबांत हिच्याशीं लग्न करण्याचं सुख नाहीं; निदान हिच्या आवडीनिवडी पुरविण्याचं सामर्थ्य तरी आपल्याकडे आहे एवढ्यावरच तो संतुष्ट होता. पण त्याचं दुर्दैव त्याला स्वस्थ बसू द्यायला तयार नव्हतं. मॉंग-सोला लौकरच कळलं कीं या मुलीचं आपल्या आतेभावाशीं सूत जमतं आहे व लौकरच त्यांचं लग्नहि होणार आहे.

[पान २६ वर]

**प्रश्न : साहित्य-लेखन (वाङ्मय-निर्मिती) हा धंदा कीं कला ?**

**उत्तर :** साहित्यलेखन हा धंदा व वाङ्मय-निर्मिती ही कला होय.

**प्रश्न : 'बायकोचा भाऊ' ह्या प्राण्या-विषयीं सर्वत्र उपेक्षा कां आढळून येते ?**

**उत्तर :** त्याचें अस्तित्व अपेक्षित नसतें म्हणून.

**प्रश्न : अत्रे पुन्हा काँग्रेस-प्रवेश करते झाले तर ?**

**उत्तर :** 'हंशा आणि टाळ्यां'ची नवीन आवृत्ति निघेल.

**प्रश्न : बाळु केसकर पडले, आतां त्यांनी काय करावं ?**

**उत्तर :** गांधर्व महाविद्यालयांत शागिर्दी पत्करून जुन्या वशिल्यावर आकाशवाणीच्या राष्ट्रीय कार्यक्रमांचा मक्ता मिळवावा.

**प्रश्न : मंत्र्याच्या अंगीं कोणते गुण असावे लागतात ?**

**उत्तर :** निदान एक--सफाईनें थापा मारणें!

**श्री. सुदाम मारुति नेवासे,** दौंडाईचे.

**प्रश्न : मलावरोध कां होतो ?**

**उत्तर :** आळसामुळें.

**श्री. दि. दु. कुळकर्णी,** भुसावळ.

**प्रश्न : स्त्रीपुरुष एकमेकांच्या प्रेमांत पडतात म्हणजे नक्की काय होतें ?**

**उत्तर :** दृष्टी अधू झाली कीं प्रेमाचें मृग-जळ दिसूं लागतें आणि साहजिकच त्याच्या शोधार्थ हिंडणारें स्त्री-पुरुष पाय घसरून आपो-आप पडतात. ह्यालाच सांकेतिक भाषेंत प्रेमांत पडणें म्हणतात.

**प्रश्नः आपल्यापेक्षां बोलण्यांत पटा-ईत असलेल्या बायकोला मुठींत कसें ठेवावें ?**

**उत्तर :** श्रीमुखांत देऊन.

**प्रश्न : वयांत आलेल्या प्रत्येका (की) नें लग्न केलेच पाहिजे का ?**

**उत्तर :** सांस्कृतिक नियमानुसार होय व सरकारी (प्रजाविरोधी) धोरणानुसार नाहीं !

**प्रश्न : पत्नी आणि बायको यांत काय फरक आहे ?**

**उत्तर :** स्त्री ही क्षणाची पत्नी असून अंतकाळची बायको असते.






**प्रश्न : अमेरिकन अध्यक्ष श्री. केनेडी व केनेडी ब्रिज यांचा कांहीं संबंध आहे काय ?**

**उत्तर :** असली खाजगी बातमी आंतर-राष्ट्रीय सुरक्षिततेच्या नियमानुसार प्रगट करणें इष्ट नव्हे. पण केनेडींचें पूर्वज कदाचित् त्या बाजूस गेले असण्याचा संभव आहे.

**प्रश्न : नवकवि खरोखर काव्य करतात काय ?**

**उत्तर :** होय. 'खर' ह्या शब्दाचा अर्थ गाढव असा होतो.

**प्रश्न : नवकविता कशी ओळखावी ?**

**उत्तर :** जिच्यांत यमकापेक्षां यमाचाच संचार आढळतो ती नवकविता !

**प्रश्न : नवकवि दाढी कां ठेवतात ?**

**उत्तर :** नवकवींच्या हनुकेशभूषेला दाढी म्हणत नाहींत. इंग्रजीत तिला गोटी (Goatee) म्हणतात. इंग्रजी शब्द 'गोट' म्हणजे बकरा ह्या शब्दापासून झालेला आहे. सुज्ञास अधिक सांगणें न लगे.

---

वाचकांना अडलेल्या चमत्कारिक प्रश्नांना उत्स्फूर्त उत्तरें देण्यासाठीं प्रस्तुत सदराची योजना सुरू झाली आहे. मराठी साहित्यांतले एक अष्टपैलू लेखक वाचकांकडून येणाऱ्या प्रश्नांस उत्तर देण्यास सिद्ध जाहले आहेत. मात्र ह्या शरसंधानामुळें वर्मी घाव बसल्यास त्याचें पाप माथीं नको म्हणून तूर्त अनामिक अवस्थेंतच त्यांनी हें कार्य पत्करलें आहे. वाचकांनीं आपले सुबोध प्रश्न सुवाच्च अक्षरांत लिहून पाठवावे. अवाच्य प्रश्नांना उत्तरें दिलीं जाणार नाहींत.

---

**प्रश्न : शंभर वर्षांत भारताची लोक-संख्या सध्यांच्या पांचपट होईल असें नियोजन मंडळानें जाहीर केलें आहे. म्हणजे कुटुंबनियोजन अयशस्वी होणार काय ?**

**उत्तर :** जया देव तारी तया कोण मारी ?

**श्री. सुरेश चपळगांवकर,** गेवराई,
मराठवाडा.

**प्रश्न : पाप म्हणजे काय ?**

**उत्तर :** जे 'आप' नव्हे तें पाप !

**प्रश्न : खरें पाप कोणतें ?**

**उत्तर :** जें थाप मारूनही पचत नाहीं तें.

**प्रश्न : पापाची प्रचीति कशानें मिळते ?**

**उत्तर :** बदतीनें !

**प्रश्न : स्त्रीचें सुख दागिन्यांवर अव-लम्बून आहे काय ?**

**उत्तर :** स्त्रीचें खरें सुख सर्वस्वी पतीवर अवलम्बून आहे. पती हाच स्त्रीचा श्रेष्ठ अलंकार आहे असें म्हणतात.

**प्रश्न : स्त्रीमुळें महाभारत घडलें, रामायण झालें, दुसरें महायुद्ध झालं, नानावटी प्रकरण सुद्धा--स्त्रीमुळेंच सर्व वाईट गोष्टी घडतात हें खरं आहे काय ? ह्याला स्त्री कितपत जबाबदार आहे ?**

**उत्तर :** आपल्या वाटनें निघ[illegible] जाणाऱ्या अबलेच्या वाटेला पुरुष गेल्यामुळेच ह्या सर्व गोष्टी घडल्या हें खरं मानलें तर तिला निष्कारण जबाबदार धरण्यात काय अर्थ आहे ! शिवाय एका हातानें [illegible] वाजली होती काय ?




प्रकरणीं स्त्री पोलिसांचाच म्हणजे गुन्हेगार आरोआप ल.

द. सदावर्ते, ठाकुरद्वार
कचरपट्टी.

र हें जर ड्रेनेज असेल नेजच्या वरच्या भागांत विचार म्हणजे वळवळ- तील तर निर्मिती म्हणून स करतो त्याला काय

सिद्ध ग्रीक तत्ववेत्ता ॲरिस्टॉ- र्ये तत्वाआधारें प्रस्तुत क्रियेस तां येईल.

ग. परब, गोरेगांव.

ही पुरुषांच्या मार्गातील कितपत खरें आहे ?

वट खरें ! स्त्री ही पुरुषाच्या मैलाचा दगड आहे असें . नुकत्याच एका महिला ला पर्वते ह्यांच्या नेतृत्वाखाली ा वादविवादस्पर्धेत 'पुरुष हा घोडा आहे' हा ठराव

उत्तर : थँक्स्.

श्री. हरी पंढरीनाथ माणीकराव, बडुर.

प्रश्न : पुरुषांऐवजीं जगांत स्त्रियाच असत्या तर काय झालें असतें ?

उत्तर : पतिव्रतांचें साम्राज्य !

प्रश्न : मनुष्य जगतो कुणासाठीं- स्त्रीसाठींच ना ?

उत्तर : मनुष्य आपल्यासाठी जगतो आणि स्त्रीसाठीं मरतो.

प्रश्न : आम्हां महाराष्ट्रीय लोकांचें चुकतें नक्की कुठें ?

उत्तर : पश्चाताप करण्यांत !

प्रश्न : राष्ट्राचीं सूत्रें तुमच्या हातीं आलीं तर प्रथम काय करणार, आपल्या अंकाचा खप कीं राष्ट्राची प्रगती ?

उत्तर : फुकट्या वाचकांची सोय !

श्री. दिलीप नारायण सप्रे, विलेपार्ले (पूर्व).

प्रश्न : नव्या नाट्यप्रयोगाच्या पहिल्या प्रयोगानंतर बहुधा त्याच्या दोषांवरच अधिक चर्चा होते असें कां ?

उत्तर : पुढच्या प्रयोगाचे 'फ्री पास' मिळावे म्हणून.




कार 'कांहीं' लोकांना परवाने कां देते ?

उत्तर : दारूमुळें आपल्या सत्यानाश झाला हें दारूबंदी तोंडून वदवून घेण्यासाठीं.

उपेंद्र जगदाळे

प्रश्न : माझा एक मित्र ज्ञानाचा तो पदवीधर पदवी परीक्षेत सुवर्णपदक आहे. असें असूनही अजू शिवायच आहे.

उत्तर : त्याला टायपिंग न नसल्यास त्याचा तत्त्वज्ञानाचा आहे.

मुरली मनोहर

प्रश्न : केवळ मराठी पोट भरणें शक्य आहे का

उत्तर : हो......मुंगीचें !

सौ. कुसुमावती रा. देव

प्रश्न : विश्वांत अस्ति सर्व सुखें कधींकाळीं मा शकतील असें आपणास

उत्तर : नाहीं. एक वेळ झाला तरी दुःखी होण्याचें बसणार आहे !

अजय आजगांवकर

प्रश्न : तुम्हांला सुखी सदरा मिळाला तर तुम्हीं

उत्तर : आधीं तो वॉशिं वयास टाकणें !

वासू शेंबवणेकर

प्रश्न : तुम्हीं कधीं झाला आहांत काय ?

उत्तर : अनेक वेळां. फार गोष्ट. तुम्हीं कधीं प्रयत्नच नाहीं तर कसे होणार ? लक्षां होत आहे रे...

द. पा. कातगडे, मिरज.

प्रश्न : माझ्या एका धन मला चांगली खोड जिर कशी जिरवं ?

# बळी! बळी!! बळी

*गेलीं ५० वर्षें जपानी साहित्य सातत्यानें लिहिणारे* **तानिझाकी जुनिचिरो** *यांनी १९१० साली लिहिलेल्या एका प्रमाथी* **कथेचा श्री. प्रेमानंद वळवईकर यांनी** *केलेला अनुवाद.*

सेकिचीचं नांव ठाऊक नाहीं असा माणूस सबंध जपानांत सांपडणें विरळा. त्यांत अस्वाभाविक असं कांहींच नव्हतं. तो होताच तसा प्रतिभावंत तरुण. त्याचा पिंड अस्सल कलावंताचा होता. लहानपणीं चित्रकलेचा एक सामान्य विद्यार्थी म्हणून शालेय विश्वांत वावरणारा सेकिची आज आंतरराष्ट्रीय ख्यातीचा मानकरी होऊं पाहात होता. देहावर चित्रं गोंदण्याच्या कलेंत त्याचा हात धरणारा कोणी नव्हता. या पेशांत आजवर नांवाजलेले चरीबुन, याक्कोई, दारुमाकी, काराकुसा यांसारखे पट्टीचे कलाकारही त्याचा हेवा करीत. त्यांना त्याचा मनस्वी मत्सर वाटे. या प्रत्येकांत जरी स्वतःचं असं स्वतंत्र वैशिष्ट्य होतं तरी सेकिचीच्या कलाकृतींत या सर्व वैशिष्ट्यांचा बेमालूम ठळक आविष्कार झालेला असायचा. दरवर्षी होणाऱ्या स्पर्धेत पारितोषिकास पात्र ठरणारे उमेदवार बहुधा सेकिचीचींच गिऱ्हाइकं असत. त्यामुळं सेकिचीबरोबर तें चित्र देहावर धारण करणारा माणूसही आपोआप प्रसिद्धीला येई. चारचौघांत त्याचं नांव घेतलं जाई. इतरांप्रमाणें आपणासही तें भाग्य प्राप्त व्हावं यास्तव बऱ्याच जणांत नेहमीं अहमहमिका लागलेली असे. सेकिचीकडून गोंदवून घेण्यांत ते धन्यता मानीत. शरीरावर गोंदलेली उत्कृष्ट चित्राकृति म्हणजे सौंदर्याचं एक सर्वश्रेष्ठ लक्षण समजलं जात असे त्यावेळीं.

सेकिचीनं जागतिक कीर्ति संपादन केलेली असली तरी एकार्थी त्याचा कलात्मा अतृप्त होता. पुष्कळ वर्षांपासून त्याची एक मनीषा अपुरी होती. एखादी मृदु गौरांग सुंदरी त्याच्याकडे गोंदवून घेण्यासाठीं

यावी, या संधीची तो चातकाप्रमाणं वाट पाहत होता. कल्पनेच्या आधारानं त्यानं या सुंदरीचा देह घडवला होता. शरीररचना व व्यक्तिमत्व या दोन्ही दृष्टींनीं ती त्याच्या कसोटीला उतरणं आवश्यक होतं. केवळ आकर्षक चेहरा आणि गोरा वर्ण असून सेकिचीचं समाधान होण्यासारखं नव्हतं. तो तिचं प्रत्यक्षांत दर्शन घेण्यासाठीं अविरत श्रमत होता. सौंदर्यासाठीं सर्वश्रुत असलेल्या अनेक उच्चभ्रू वारांगना त्यानं पाहिल्या होत्या. कसोशीनं न्याहाळल्या होत्या, परंतु त्याच्या कलारम्याची भूक शमली नव्हती. प्रत्येक वेळीं त्याची दारुण निराशा झाली होती. त्याच्या कल्पित मानससुंदरीचा ध्यास घेऊन आज तीन वर्षांचा कालावधि लोटला. उगवणारा प्रत्येक दिवस त्याला कंटाळवाणा जाई. तिची प्रतिमा मात्र त्याच्या डोळ्यासमोर अहर्निश तरळत असायची.

उन्हाळ्याचे दिवस होते. एके दिवशीं संध्याकाळीं फुकागवाच्या रस्त्यांतून सेकिची फिरत होता. हिरेशी क्लबमधून एक पडदेबंद मेणा बाहेर पडतांना त्याला दिसला. पडदे जाळीदार होते, तरी आंत बसलेल्या स्त्रीचा चेहरा दिसूं नये असा बंदोबस्त केला होता. मेणा त्याच्या अगदीं जवळून गेला. तिचं दर्शन घेण्याची त्याला अनिवार इच्छा झाली. त्याचं सगळं लक्ष तिच्या पावलावर केंद्रित झालं. क्षणभर तो देहभान विसरला. पडद्याआड लपलेल्या चेहऱ्याइतकंच ते पाऊलहि बोलकं होतं. एखादं दुर्मिळ रत्न हातास लागावं तेवढा आनंद त्याला झाला. तिचीं नाजुक निमुळती बोटं, सप्तरंगी नखं, गोलाकार टाच आणि वर्ण तर जणूं कांहीं कित्येक वर्षांपासून एखाद्या डोंगराळ झऱ्याच्या निर्मळ पाण्यानं धुतला गेल्यानं स्फटिकाशीं स्पर्धा करणारा वाटत होता. त्यामुळं कोणाही पुरुषाच्या भावना चेतवल्या जाणं स्वाभाविक होतं. सेकिचीची अगदीं ठाम समजूत झाली. कांहीं वर्षांपासून ज्या स्त्रीच्या शोधांत आपण होतों ती हीच. तिला पाहण्यासाठीं तो उतावीळ झाला. मधुर कल्पनांचा महापूर त्याच्या मनांत लोटला. त्यांचा मागोवा घेत तो लगबगीनं चालूं लागला. मेणाधारी भोई द्रुत गतीनं चालत होते. रस्त्यामागून रस्ता आणि आडवी तिडवी वळणं मागं पडत होतीं. कुठं जायचं आहे ह्याची सेकिचीला मुळींच कल्पना नव्हती. लोहचुंबकानं आकर्षून घेतलेल्या पदार्थाप्रमाणं तो त्यांच्या मागोमाग चालला होता. बरंच अंतर तो चालला होता. अजून कितीतरी अंतर तो चालला असता. परंतु दैवयोग कांहीं तसा नव्हता. रस्त्याच्या एका वळणावर त्यांची चुकामूक झाली. भोई कुठं दृष्टिआड झाले. सेकिची निराश झाला. तेव्हांपासून तिच्याबद्दल वाटणारी आसक्ति केवळ आसक्तीच राहिली नाहीं, तर तिचं अतिशय दृढ अनुरागांत परिवर्तन झालं.

मध्यंतरी एक वर्षाचा काळ गेला. सकाळची वेळ होती. ताकुमी मोहल्ल्यांत सेकिचीची एक मैत्रिण–नर्तिका राहत होती. तिच्याकडून निरोप घेऊन आलेली एक तरुण मुलगी त्याच्यासमोर उभी होती.

'माफ करा,' ती किंचित् बुजरेपणानं म्हणाली. 'माझ्या मालकिणीनं हें स्वतः नेऊन पोंचवण्याबद्दल मला पाठवलं आहे.'

असं म्हणत एक बंद लखोटा तिनं त्याच्या हातांत दिला.

मोठ्या उत्कंठेनं त्यानं लखोटा फोडला. त्यानं पत्राची घडी उघडली. तो पत्र वाचूं लागला. नर्तिकेनं त्यांत लिहिलं होतं, पत्र घेऊन आलेली तरुणी नुकतीच दत्तक घेतलेली तिची वारसदार होती. तिचं नांव होतं हयाशी. लवकरच नर्तिका म्हणून तिला जनसमुदायासमोर आणायचं होतं. त्या निमित्त एक जंगी समारंभही घडवला जाणार होता. तिच्या भावी आयुष्याच्या दृष्टीनं सेकिचीच्या कलेचा उपयोग करण्याबद्दल तिनं त्याला विनवलं होतं.

सेकिचीनं तिला अगदीं जवळून न्याहाळलं. वरवरून ती सोळासतराची वाटत होती. परंतु चेहऱ्यावरील भाव मात्र तिच्या पूर्ण यौवनावस्थेची चांगलीच ग्वाही देत होते. एक अजब जादू तिच्या डोळ्यांत होती. तिच्या आजीवन सहवासाची स्वप्नं पाहणाऱ्या, शहरांतील समस्त देखण्या तरुणांचं जणूं एक भव्य प्रदर्शन तिच्या डोळ्यांत साकार झालं होतं. गुण आणि दुर्गुणाचं तें विशाल केंद्र वाटत होतं. तिच्या देहावरून फिरणारी त्याची बुभुक्षित नजर तिच्या पावलावर एकदम स्थिर झाली. त्याला विस्मयाचा धक्का बसला. ती पावलं त्याला परिचित वाटत होती. आपला कांहीं पूर्वऋणानुबंध असल्यागत त्याला वाटत होतं. सुप्तावस्थेंतल्या त्याच्या जाणिवा जागृत झाल्या. मागची घटना त्याला आठवली.

"गेल्या वर्षीच्या जूनमध्यें तुझा मुक्काम हिराशी क्लबमध्यें होता का?" सेकिचीनं जिज्ञासापूर्वक सवाल टाकला.

त्याच्या या अनपेक्षित प्रश्नानं हयाशी स्तिमित झाली. होकारार्थी मान हालवीत ती म्हणाली, "होय. आपला अंदाज बरोबर आहे. मीच होतें ती. माझे वडील त्यावेळी हयात होते. ते अधूनमधून मला आपल्याबरोबर घेऊन जायचे."

"तब्बल पांच वर्षांपासून मी तुझी प्रतीक्षा करतोंय." सेकिचीनं म्हटलं. "आज प्रथमच मी तुझा चेहरा पाहतोंय. तरीसुद्धां तुझ्या पावलांशीं माझा पूर्वपरिचय आहे ह्याची तुला कल्पना नसेल. त्याच्या मोहिनीनंच मी अक्षरशः वेडा झालों. माझ्याबरोबर आंत चल. भिण्याचं मुळींच कारण नाहीं."

असं म्हणत त्यानं तिचा हात धरला. तो तिला मजल्यावरील खोलीकडं घेऊन निघाला. तेथील खिडकींतून पूर्वेकडील निसर्गरम्य प्रदेश दिसत होता. समोर नदीचं रुंद पात्र पसरलं होतं. खोलीच्या मध्यभागीं एका बाटोळ्या टेबलापाशीं त्यानं तिला उभं केलं. तो पलीकडं गेला व दोन भव्य चित्रांची गुंडाळी घेऊन परत आला. त्यापैकीं एक चित्र त्यानं हयाशीपुढं पसरवून ठेवलं.

प्राचीन चिनी सम्राट–चाऊ, त्याची तरुण पट्टराणी म्होशीचं तें रंगीत चित्र होतं. सरळ बागेपर्यंत जाणाऱ्या जिन्याच्या वरच्या कठड्याला ती रेलून उभी होती. तिनं परिधान केलेल्या मौल्यवान भरजरी उपवस्त्राची खालची बाजू पायऱ्यांवर अगदीं अलगद विसावली होती. वैदूर्य नीलरत्नांनीं व पोवळ्यांनीं जडवलेला किरीट तिनं डोक्यावर धारण केला होता. तिच्या नाजुक मानेला त्याचा भार पेलेलसा वाटत नव्हता. किंचित् कललेला एक चषक तिनं उजव्या हातांत धरला होता.बहुधा तो मद्याचा असावा. आपल्या सुरत पण तुच्छतापूर्वक नजरेनं ती बागेंतील कैद्याकडं पाहत होती. तिच्या समक्ष त्याचा शिरच्छेद केला जाणार होता. मिटलेले डोळे, मान आडवी पडलेली, अशा गलितगात्र अवस्थेंत तो अंतिम क्षणाची वाट पाहत होता. वास्तविक अशाप्रकारचं दृश्य रंगवणं थोडसं विकृत अभिरुचीचं लक्षण म्हणतां

अनुक्रमणिका






आलं असतं. परंतु चित्रकारानं राणीच्या आणि उपेक्षित माणसाच्या चर्येवरील सूक्ष्म भावदेखील इतक्या कुशलतेनें चित्रित केले होते कीं, कलेचा एक परमोच्च उत्कर्षबिंदु गांठला गेला होता.

बराच वेळ ती चित्राकडं एक टक लावून पाहत उभी होती. क्षणाक्षणानं तिच्या डोळ्यांतील तेज बदलत जाऊन चित्रांत दाखविलेल्या चिनी राणीच्या चेहऱ्यावरील भाव तिच्या ठायीं दृश्यमान होऊं लागले.

'ह्या चित्राच्या रूपानं तुझ्यामधील सगळ्या प्रवृत्ति प्रगट झाल्या आहेत.' सेकिचीनं तिला उद्देशून म्हटलं.

'पण इतकं भयानक चित्र तुम्ही मला का दाखवलं ?' दोन्ही हातांनीं आपलं कपाळ गच्च दाबून धरीत हयाशीनं विचारलं.

'कारण हें चित्र म्हणजे प्रत्यक्ष तूंच आहेस. तिचं रक्त तुझ्या नसानसांतून खेळतं आहे.'

सेकिचीनं चित्राची दुसरी गुंडाळीही सोडली. चित्राच्या वरच्या कोपऱ्यात डावीकडं 'बळी' नांवाचं शीर्षक होतं. अगदीं मधोमध फुलांनीं बहरलेल्या झाडापाशीं एक तरुण स्त्री उभी होती. तिच्या चरणापाशीं इतस्ततः पडलेल्या असंख्य माणसांच्या मुडद्यांकडं ती रोखून बघत होती. अहंकार आणि समाधानमिश्रित भाव तिच्या मुद्रेवर कुत्सितपणानं विलसत होते. त्या अस्ताव्यस्त शवांवरून छोट्या-छोट्या चिमण्यांचा थवा चिवचिवाट करीत स्वच्छंदपणं बागडत होता. प्रस्तुत चित्र एखाद्या रणक्षेत्राचं किंवा वसंत ऋतूमधील उद्यानाचं होतं हें अचूक हुडकणं बरंच अवघड होतं.

'तुझ्या भावी आयुष्याचं मूर्तिमंत प्रतीक म्हणजे हें साक्षात् चित्र !' त्यातील स्त्रीचं तिच्या रूपाशीं साम्य लक्षांत आणून देत तो म्हणाला, '–आणि जमिनीवर पडलेले हे मुडदे म्हणजे तुझ्या प्राप्तीसाठीं आत्मनाश ओढवून घेणारे अभागी पुरुष होत.'

तिच्यानं ते शब्द ऐकवले नाहीं. तिनं कानावर हात ठेवले. 'कृपा करून तें चित्र बाजूला न्या. माझ्यानं तें बघवत नाहीं.' अतिशय अजिजीच्या स्वरांत ती सांगत होती. चित्रांतील भयानकता विसरण्याच्या हेतूनं तिनं चित्राकडं पाठ वळवली अन् स्वतःचं अंग तिनं चटईवर धाड्दिशीं घालून घेतलं. तिच्या सर्वांगाला थरकांप सुटला. हलके हलके ती हुंदके देऊं लागली.

'होय. मी कबूल करतें. ईश्वराला स्मरून कबूल करतें. मला माझ्या रूपाचा गर्व आहे. तिच्या सर्व प्रवृत्ति माझ्या स्वभावांत आहेत. परंतु एकदाचं तें चित्र माझ्या नजरेसमोरून दूर करा.'

'एखाद्या भित्र्याभागुबाईप्रमाणं वागूं नकोस. एकवेळ त्या चित्राकडं अभ्यासपूर्ण दृष्टिकोनांतून बघ म्हणजे मग भीतीचं कारण उरणार नाहीं.'

डोकं वर करून पाहण्याचं धाडस तिला झालं नाहीं. हातांच्या अस्तन्यामध्यें तिनं आपला चेहरा दडवला होता. तशाच अवस्थेंत

ती त्याला सारखी विनवीत होती. ' मला घरीं जाऊं द्या...मला घरीं जाऊं द्या. येथं मला भीति वाटते. '

' अजून थोडा वेळ थांब. आज जगाच्या आश्चर्यांत मी आणखी एकाची भर घालीन. ' सेकिची मोठ्या गर्वानं म्हणाला. ' तुला सौंदर्य-सम्राज्ञी बनवण्याचं सामर्थ्य केवळ माझ्या एकट्यांत आहे. '

फडताळवजा कपाटामधून कांहीं रंगाच्या वाटल्या अन् सुया त्यानं भरभर निवडून घेतल्या. तीव्र गुंगी आणणाऱ्या औषधाची एक कुपीही त्यानं निवडून घेतली.

चढत्या सूर्याचं ऊन नदीच्या पाण्यावर लकाकत होतं. तिच्या लाटांवर चमकणारीं किरणें परावर्तित होऊन खिडकीच्या तावदानावर पडत होतीं. त्यामुळं बेहोष हयाशीचा चेहरा अधिकच उजळून निघाला होता.- सेकिचीनं दार किंचित् ओढून घेतलं व तो तिच्या अगदीं शेजारीं येऊन बसला. आतां प्रथमच तो तिच्या खुल्या देहाचं दर्शन घेऊं शकत होता. प्रसंग मोठा बांका होता. तसं नसतं तर युगानुयुगं तो तिच्या स्थिर, निर्विकार चेहऱ्याकडं पाहात बसला असता.

कांहीं क्षणापूर्वी स्फुरलेली चित्राची कल्पना त्याला हातावेगळी करावयाची होती. त्याचं मन अगदीं अधीर झालं होतं. गोंदण्याची उपकरणं त्यानं हाताशीं ठेवलीं. तिच्या शरीरावरचे कपडे त्यानं अजून थोडे दूर सारले. काळसर रंगाच्या शाईनं एक चित्राकृति त्यानं तिच्या पाठीवर रेखाटली. काढलेल्या रेखांवरून त्याची तीक्ष्ण सुई आतां सफाईनं चालत होती. मेंफिस लोकांनीं इजिप्तची रम्य भूमि जशी स्फिन्क्स आणि पिरामीड उभारून नितांत शोभायमान केली तशी सेकिची तिची नितळ कांत आपल्या कलेनं अजरामर करणार होता. तो कामांत तन्मय झाला. स्वतःचा आत्मा जणूं तो त्या चित्रांत ओतीत होता. आणि तिच्या शरीरांत भरला जाणारा लाल रंग,...रंग नसून त्याचं स्वतःचं रक्तच होतं तें.

सेकिचीला काळाचं बंधन नव्हतं. वेळेचं भान त्याला राहिलं नाहीं. तहान व भूक ह्यांची त्याला विस्मृति पडली. दुपार आली अन् ओसरली. सूर्य क्षितिजाकडं कलंडला. त्याचा हात अविश्रांतपणं चालत होता. हयाशी अतीव निद्रेंत चूर होती. मधें एकदाही ती जागली नाहीं. सूर्यास्त झाला. मंद गतीनं अंधारानं खोलींत पाऊल टाकलं. गोंदण्याची क्रिया अद्याप अर्धवट होती. त्यांच्या कामांत व्यत्यय आला. तो कष्टपूर्वक उठला. त्यानं दिवा लावला. तो परत खालीं बसला आणि सुई हातांत धरली.

सुईचा प्रत्येक स्पर्श तो आतां महत्प्रयासानं करीत होता. तिला होणाऱ्या दुःसह वेदना प्रत्यक्ष त्याच्याच हृदयाला जाणवल्याप्रमाणं तो जड निःश्वास टाकीत होता. मध्यरात्र उलटून गेली असावी. बाहेर नीरव शांतता पसरली होती. त्याचं काम अविरत चालू होतं. तिच्या पाठीवर एका प्रचंड कोळ्यांची आकृति आकार घेत होती. सूर्योदयाचा समय समीप येत चालला होता. संधिप्रकाशाचा धूसर झोत खोलींत येऊं लागेतों, एका सैतानी वृत्तीच्या कोळ्यानं आपल्या अष्टपदाचं जाळं तिच्या पाठभर पसरविलं होतं.

रात्र संपली. दिवस उजाडला. नदीतून इकडून तिकडं जाणाऱ्या नावांच्या वल्ह्यांचा सप् सप् असा आवाज ऐकूं येत होता. पहाटवाऱ्या-बरोबर मच्छीमारीसाठीं निघणाऱ्या छोट्या बोटींचीं शिडंही दिसत होतीं. धुकं विरळ होऊं लागलं होतं.

सेकिचीनं शेवटीं हातातील सुई खालीं ठेवली. सुटकेचा एक दीर्घ निःश्वास टाकून तो उभा राहिला. स्वतः काढलेल्या कलाकृतीचं तो बारकाईनं निरीक्षण व परीक्षण करूं लागला. प्रस्तुत कृतींत त्यानं आयुष्याची तपश्चर्या पणास लावली होती. कलासाधनेंतील संपूर्ण अंग-उपांग मोठ्या खुबीनं व्यक्त करण्यांत त्याला अपूर्व यश आलं होतं. एकाएकीं जीवनांत पिसाचा हलकेपणा आल्याचा त्याला भास झाला. आकाशांत कुठंतरी उंच उंच तो वाहावत चालला होता.

' तुला चिरसौंदर्य प्रदान करण्यासाठीं मी माझं जीवनचैतन्य त्यांत ओतलं आहे. ' सेकिची कांहींशा अस्पष्ट शब्दांत स्वतःशीच उद्गारला. ' या क्षणापासून तुझ्याशीं स्पर्धा करूं म्हणणारी, तुला आव्हान करणारी एकही स्त्री जपानांत राहिली नसेल ! भीतीचं शल्य आतां समूळ नष्ट झालं आहे. यापुढं सारी पुरुष जात तुझ्या सौंदर्यानं मुग्ध होऊन, भ्रमिष्ट होऊन आत्मार्पण करूं लागेल. ! ! '

त्याचे हे शब्द तिनं ऐकले असतील काय ?

तिच्या ओठांची हालचाल झाली. कण्हण्याचा आवाज तिच्या तोंडून निघाला. शरीराची चाळवाचाळव झाली. हळूहळू ती शुद्धीवर येऊं लागली. श्वासोश्वास जोरांत सुरू झाला. श्वसनक्रियेबरोबरोबर

---

[ पान २० वरून ]

आणि लौकरच मा-हिआ-शिनचा तो आते-भाऊ, तिचा होणारा पति नाहिंसा झाला. तपास करतां करतां जंगलाच्या शेजारी त्याचं प्रेत मिळालं—चळकट श्वापदाच्या पंजानें त्याची छाती फाडलेली होती.

आणि त्याच सायंकाळी मा-हिआ शिन आणि तिची मंडळी यानीं तेंमांथी सोडलं व रंगूनचा रस्ता पकडला.

* * *

आम्ही गाडीतून जात असतां थू-थान स्वच्छ आवाजांत मला सांगत होता, "महाशय आपला या गोष्टीवर विश्वासहि बसणार नाहीं—तुम्ही म्हणाल हें विसावं शतक आहे आणि आतां असल्या कथांवर कुणाचा विश्वासहि बसणार नाहीं. पण हें खरं आहे, संपूर्ण खरं आहे—

आतां मला ही गोष्ट कशी कळली असं तुम्ही विचाराल तर त्याचं उत्तर असं कीं ही गोष्ट घडली तेव्हां योगायोगानें मी तमांथीला गेलों होतों आणि मा-हिआ-शिन आणि तिची मंडळी यांना रंगूनला आणण्याचं काम मीच केलं. त्याच रात्रौ आम्ही ६०० मैलांचा प्रदीर्घ रस्ता तुडवावयास सुरवात केली.—"

एकाएकी आमची मोटार एका घरासमोर येऊन थांबली होती. आम्ही खालीं उतरलो आणि एका बैठ्या घरांत प्रवेश केला. त्या घराचा दरवाजा एका अतिलठ्ठ स्त्रीनं उघडला. "मी बोलण्यापूर्वीच थू-थाननी आपल्या पत्नीची ओळख करून दिली."

ब्रम्ही स्त्रिया विवाहानंतरहि आपलं माहेरचं नांव बदलीत नाहींत. माझ्या समोर उभी असलेली, कर्कश आवाजांत बोलणारी व मला जेवणाचा आग्रह करणारी, दोनशें पौंड वज-नाची ही स्त्री म्हणजेच तीस वर्षांपूर्वींची त्या बुद्ध भिक्षूची हृदय-देवता मा-हिआ-शिन होती.

• • •






तिच्या पाठीवरील कोळयाचे पाय हालूं लागले. जसा एखादा जिवंत प्राणी वाटावा !

‘ तुझ्या देहाला हा दुष्ट कोळी बिलगल्यामुळंच का तुला इतक्या वेदना होत आहेत ? ’ तो स्वतःशींच उद्‌गारला.

तिनं अर्धवट डोळे उघडले. शून्य दृष्टीनं ती अधांतरी पाहत होती. एक प्रकारचं विशिष्ट बल तिच्या ठायीं संचारत होतं.

‘ माझ्या पाठीवरचं गोंदण मला पाहूं द्या ’ हयाशीनं जिज्ञासा-पूर्वक विधान केलं. ‘ तुम्ही माझ्यास्तव आपलं आत्मिक बल वेचलं आहे. खरोखरच मी सुंदर दिसत असले पाहिजे. ’ स्वप्नांत बरळल्या-प्रमाणं ती बोलत होती.

‘ त्यासाठीं तुला अगोदर गरम पाण्यानं स्नान करावं लागेल. नंतरच रंगाची खरी खुलावट !......परंतु किती यातना सहन करा-यला लागतील तुला......! भयंकर यमयातना...!! मन पाषाणाचं करावं लागेल ! ’ सेकिची अगदीं कळवळून म्हणाला.

‘ सुंदर दिसण्यासाठीं मी कोणतंही महान दिव्य करण्यास तयार आहे. ’ निर्वाणीच्या आवेशांत ती म्हणाली.

‘ स्नानगृहाकडे जाण्यासाठीं सेकिचीच्या आधाराने ती जिन्याच्या पायऱ्या उतरूं लागली. ती स्नानगृहांत शिरली. कढत पाणी तिच्या नाजुक देहाला चटके देऊं लागलं. तिच्या सर्वांगाचा दाह झाला. दुःखाच्या ज्वाळांचा डोंब तिच्या डोळयांत उसळला.

‘ आई ग...! ’ एक दुःखार्त चित्कार तिच्या तोंडून बाहेर पडला. ‘ मला इथंच राहूं द्या. तुम्ही माडीवर चला. माझी तुम्हांला प्रार्थना आहे. अशा तऱ्हेनं विव्हळताना मला दुसऱ्या कुणींही पाहूं नये. कपडे करूनच मी वर येईन. ’

स्नानगृहातून हयाशी बाहेर आली. त्यावेळीं स्वतःचं अंग कोरडं करण्याचंही त्राण तिच्यांत नव्हतं. तिचे हातपाय थरथरत होते. तिला आधार देऊं पाहणाऱ्या सेकिचीचा हात तिनं बाजूला सारला. धाड्‌दिशीं ती जमिनीवर कोसळली. तिचं अंग ठणकत असावं. ती सतत कण्हत होती. तिचे लांबसडक काळे केस संपूर्ण विस्कटले होते. मागच्या बाजूस उभ्या असलेल्या आरशांत तिच्या दोन्ही पायाचे तळवे दिसत होते. स्फटिकही त्यांच्यासमोर फिका वाटावा.

सेकिची बराच वेळ थांबून तिची वाट बघत होता. ती आली तेव्हां तिची वेषभूषा अतिशय काळजीपूर्वक आणि नीटनेटकी केलेली दिसली. तिचे ओलसर केस विंचरलेले होते व मोकळया केसांचीं टोकं खांद्यावरून खालीं लोंबकळत होती. तिची प्रफुल्लित मुद्रा, धनुष्याकार भुंवया, मादक नेत्र, गोरा वर्ण, कमनीय बांधा या सर्व आकर्षणामुळं तिच्या मनोहारी लावण्याची कुणालाही भुरळ पडावी. बेडरपणाची विलक्षण धार तिच्या नजरेंत होती. आपल्या सौंदर्याचं मोहजाल टाकून लुब्ध पुरुषांना जायबंदी करण्याचा-नव्हे, जीव घेण्याचा पेशा ती पत्करणार होती. आतां तिला समोर पाहून सेकिचीला कालची भयभीत झालेली हयाशी आठवली. कालची हयाशी हीच आहे, असं म्हणण्याचं धाडस त्यालाही झालं नसतं. दोघींच्या बाह्य स्वरूपांत जमीनअस्मानाचं अंतर होतं. कांहींसा विचार करून तो दुसऱ्या खोलींत गेला. येताना कालच्या दोन्हीं चित्रांची गुंडाळी त्याच्या हातांत होती.

‘ माझी हीं दोन्ही चित्रं मी तुला भेटीप्रीत्यर्थ देत आहे ’ नंतर थोडा वेळ थांबून तो म्हणाला, ‘-आणि हो मी तुझ्या पाठीवर गोंद-लेली अविस्मरणीय कलाकृति अर्थात तीहि तुझीच आहे. त्यांचा स्वीकार व्हावा. ’

त्याच्या शब्दाचं सहास्य स्वागत करीत ती म्हणाली, ‘ जगांतील कोणत्याच शक्तीची आतां मला भीति वाटत नाहीं. प्रत्येक पुरुषावर प्रभुत्व मिळविण्याची आकांक्षा आतून उसळी घेत आहे आणि त्या आकांक्षेचें तुम्हीं......हो, तुम्हीच पहिले बळी आहांत. ’

नुकत्याच पाजळून लखलख केलेल्या समशेरीनं वार करावा तसा एक तीक्ष्ण कटाक्ष तिनं त्याच्यावर टाकला. दोघांची दृष्टादृष्ट झाली. चित्रातील ती तरुण चिनी सम्राज्ञी तथा पक्षी व मुडद्यांनीं वेढलेली स्त्री ह्यांच्या नजरांतील भेदकपणा तिच्या कटाक्षांत होता. विजयोन्मादाची एक अहंकारी भावना सेकिचीच्या देहांत संचारली. त्याची कलासाधना पूर्णत्वास पावल्याचा ब्रह्मानंदही त्या भावनेंत साठला होता. परंतु तिच्या आक्रमक दृष्टीच्या चढाईनं मात्र त्याच्यातील कलावंत पराभूत होत चालला होता.

‘ हयाशी, तुझ्या पाठीवरचं चित्र मला पाहूं दे...! मला पाहूं दे तें.........’ सेकिची तिची विनवणी करीत होता. त्याचा स्वतः-वरचा ताबा उडाला. तो काय करीत होता, हें त्याचं त्यालाच माहीत नव्हतं. त्याच्यातील प्रज्ञाशील कलावंत कुठं अदृश्य झाला होता. अस्तित्वांत होतं तें केवळ सामान्य मनुष्यत्व !

हयाशी कांहींच बोलली नाहीं. तिनं आपलं तोंड विरुद्ध दिशेला वळवलं. ती पाठमोरी उभी राहिली. आपल्या देहावरचे कपडे तिनं हळूहळू दूर केले. सकाळच्या सूर्याची पिवळसर किरणें तिच्या पाठभर पसरलीं होतीं. आणि त्यांच्या सोनेरी प्रभेनं कोळयाचीं चित्राकृति जणूं पेटून निघाल्यासारखी वाटत होती. •••

• • •

## तुज कसें सांगु मी–

तुज कसें सांगु मी हृदयीं जें जें सले
तूं पाहूं शकसी मम हृदयीं जें फुले
ती तुलाच दृष्टी असे लाभली सर्ये
तें गुपित तुजला कळलेले आंतले...

तूं मनांत म्हणशील असा कसा हा राया
हां छंदीफंदी वर तंद्रीची छाया
किती छंद याजला काव्य नि भवसालाचा
अन् फंद सारखा माझा...हर्दि कवळावा...

—वसा कदम

• • •



# करडें गाढव

*रफिक हालिद या तुर्कस्थानांतील गेल्या पिढींतील लेखकाचीं हीं कथा १९४३ सालीं प्रसिद्ध झाली होती. त्या कथेचा श्री. रंगनाथ कुलकर्णी यांनीं केलेला हा रसाळ अनुवाद.*

नदीवरनं पाणी आणणाऱ्या मुलानीं बातमी आणली कीं, डोंगराच्या उतरणीवर एक म्हातारा पसरला आहे अन् बाजूलाच एक करड्या रंगाचं गाढव मोकाट सुटलंय.

"चला, पाहूं या तर खरं!" हसमन होजा म्हणाला.

जवळ जवळ संध्याकाळ होत आली होती. उन्हांत भाजून निघालेल्या त्या भागातल्या सगळ्या जमिनीवर, खांचखळग्यांत अन् दोन ओढ्यांच्या मधल्या माळरानावर सर्वत्र पसरलेल्या बिनसडीच्या भाताचा उग्र दर्प वातावरणांत भरून राहिला होता. सूर्य अजून तळपतच होता अन् सांडपाण्याच्या नाल्यातनं त्याची गढूळ किरणं परावर्तित होत होती. अशा तऱ्हेनं हा तुकड्यातुकड्यानं प्रतिबिंबित होणारा प्रकाश, ढगाळ आकाशांतल्या राखी रंगाच्या टिगळासारखा दिसत होता! हळूहळू हे सारं अंधुक होत गेलं अन् अखेरीस कांहींच दिसेनासं झालं.

एकामागून एक चालणाऱ्या तिघा शेतकऱ्यांनीं हळूहळू ती उभी चढण संपवीत आणली होती. त्यांतला एकजण आजारी असलेल्या घोड्यासारखा खोकत होता. पहिल्या प्रथम त्यांच्या दृष्टीस पडलं तें करडं गाढव! झुडुपांच्या आडोशाला त्या गाढवानं स्वतःसाठीं एक धूळभरली मोकळी जागा निवडून पसंत केली होती. बहुधा त्यानं ती आपल्या खुरांनीं उकरली असावी, नंतर तिथं तो आडवा झाला असावा अन् मग भरपूर लोळला देखील असावा! तूर्त तो या भूमिपुत्राजवळ आला तेव्हां त्याच्या चेहऱ्यावर विलक्षण समाधान झळकत होतं! जवळ येऊन तो थांबला अन् निर्विकार मुद्रेनं, मावळत्या सूर्याचं निरीक्षण करूं लागला!!

होजानं (कुराण पढणारानं) आरोळी ठोकली, "अरे ए मुशाफिरा तूं आहेस तरी कुठं?"

पलिकडेच एका झाडाला टेकून एक निःशक्त म्हातारा बसला होता. त्याला चांगलाच श्वास लागला होता. असहाय नजरेनं

त्यानं या नवागतांकडे पाह्यलं अन् छातीवर वोंट टेकून त्यांना कसलीशी खूण केली.

"काय आहे चाचाजी ?"

"झालंय तरी काय चाचाजी ?"

या अन् असल्या प्रश्नांना उत्तर म्हणून त्यानं घशातनं जो 'खरखर' असा आवाज काढला, त्यांत शब्द किती होते अन् श्वासोच्छास किती होता याचा अंदाज घेणं कठिण होतं. पण त्याला दम्यानं पछाडलेलं होतं हें मात्र त्या किसानांच्या ध्यानांत तात्काळ आलं.

हा म्हातारा आतांच मरणार म्हणून ते तिथंच बसून राहिले. पण थोड्याच वेळांत त्याला बरं वाटलं अन् तो उठून बसला.

त्या म्हाताऱ्याच्या अंगावरच्या कपड्याच्या जरी चिंध्या झालेल्या असल्या तरी त्याच्या दाढीचा थाट बादशाही होता. त्याच्या डोक्यावर पिवळ्या पट्ट्याचं पागोटं अन् अंगात निळसर रंगाचा पायघोळ सदरा होता. त्याच्या राठ अन् करड्या दाढीच्या तावडीतनं सुटलेल्या चेहऱ्याच्या उरलेल्या भागावर घड्या अन् सुरकुत्या यांचं साम्राज्य होतं. कडक उन्हांत भाजून निघाल्यानं त्याचा चेहरा अगदीं काळपट दिसत होता. जाड जाड पापण्यांखालून डोकावणाऱ्या त्याच्या किंचित निळसर डोळ्यांत बालिश नजर भरून राहिलेली होती! संथगतीनं त्याच्या चेहऱ्याचा नूर पालटला अन डोळेहि चकाकूं लागले. झाडाला तसाच टेकून पडल्या पडल्या घुसमटलेल्या आवाजांत त्यानं कांहीतरी खुलासा केला. तो बहुधा खूप लांबून आला असावा, अन् त्याला आणखी खूप दूर जायचं असावं.

"आपल्या जमातीच्या धर्मशाळेंत घेऊन चला याला. तिथें घेऊ द्या खुशाल विश्रांति!" हसमन होजाची ही आज्ञा कांनीं पडतांच दुसऱ्या दोघांनीं म्हाताऱ्याला उचलून त्या गाढवावर बसवलं. दोन्ही बाजूंनीं त्याला सांवरीत, हजार अडथळे ओलांडून ते मोठ्या मुष्किलीनं डोंगर उतरून खालीं आले.

सूर्य केव्हांच मावळला होता. मागं राहिलेल्या ओढ्याचं पाणी देखील खळखळत नव्हतं. चारी बाजूनीं त्यांना वेढणारे उंच उंच पर्वत तर केव्हांच झोपी गेले होते!— ढगांनीं आच्छादलेलीं, धुरकटलेलीं आपलीं प्रचंड डोकीं एकमेकांच्या खांद्यावर ठेवून ते मुस्तावल्यासारखे दिसत होते. खडकांच्या काळ्याभोर छायेंत गाढलेलं तें खेडं अंधारांत गडप झाल्यासारखं वाटत होतं. एकाहि खिडकींतनं प्रकाशाचा एवढासा देखील किरण येत नव्हता, कीं रस्त्यावर कुठं चिटपाखरूं एवढादेखील आवाज करीत नव्हतं.

हा काफिला गांवांत येऊन पोंचल्याचा आवाज झाला, तशी कांहीं दरवाजांतून मधून मधून एकादं डोकं दिसूं लागलं. गोठ्यांतल्या गायी हंबरल्या. मग हसमन ओरडला, "अरे, गेलांत कुठं तुम्ही सगळे? चला बाहेर या!" अन् मग त्यानं बातमी सांगितली, "एक पाहुणा आलाय!" मग मात्र हातांत मशाली घेऊन चारी बाजूनीं गांवकरी जमले- झोपायच्या वेळच्या किमान कपड्यांनिशींच! त्यांच्या हातांतल्या पलित्यांतनं निघणारा धूर अन् ज्वाला यांचं एक संमिश्र वलय त्या जमावाभोंवती निर्माण झालं होतं. शोधीत शोधीत ते धर्मशाळेपाशीं आले, तेव्हा त्यांना फारच आश्चर्य वाटलं.

कारण हें अनातैलियांं खेडं कुठल्याहि नांव घेण्याजोग्या गांवापासून किमान दोन दिवसाच्या चालीवर होतं. ना धड रस्ता, ना कसलीच सोय, असं हें डोंगराच्या वळचणीतलं आडरानांतलं खेडं. खूप मोठा काफिला चालला आहे हमरस्त्यावरनं. मग गंमतीनं त्यांतले कांहीं धाडसी व्यापारी जलद अंतर काटण्याकरतां क्वचित या खेड्यांत पायधूळ झाडून जायचे...पण वर्षाकांठी असे व्यापारी, अन् जवळ कपर्दिकहि नसलेले कांही भणंग भिकारी मिळून जेमतेम पांचदहा अनोळखी चेहरे गांवाच्या दृष्टीस पडायचे.

या असल्या मंडळींची दारावर थाप कोणत्या वेळीं पडेल याचा कांही नियम नसतो. मग हसमन कुणाला तरी निरोप धाडी—'पाहुण्याचं आदरातिथ्य करायची आज तुझी पाळी आहे!' मग हसमन स्वतः त्या पाहुण्याला धर्मशाळेंत नेऊन पोंचवी. तिथल्या शेकोटींत, हिंवाळा असो नाहींतर उन्हाळा असो, बारा महिने पाईन वृक्षाचीं लाकडं अखंड जळत असायचीं... अन या अडाणी अपरिचितांनीं आणलेल्या निराधार अन् चुकीच्या बातम्यांवरनं गांवकऱ्यांचा जागतिक घडामोडीशीं परिचय होत असे.

तो आजारी म्हातारा गप्प बसून होता. तो एकाएकीं म्हणाला, "घडीघडी माझ्या छातीचा हा असा भाता होतो पहा."

शेकोटीवर अडकवून ठेवलेल्या गजाच्या कडींत एका गांवकऱ्यानं तांब्याची किटली अडकवली. रंगीबेरंगी ज्वाला तिच्यांत प्रतिबिंबित होत होत्या. किटलीतल्या द्रवाच्या वाफा वर उसळू लागल्या तसे त्यातनं रंगीबेरंगी बुडबुडे फुटूं लागले—साबणाच्या फेंसासारखे! मग त्यांनीं ती किटली उतरवून, एक कप भरून त्या म्हाताऱ्याला दिला. फुंकून फुंकून तो मोठ्या मजेंत पिऊं लागला. तें 'दुग्धपान' तो आतां संपवणार एवढ्यांत त्याला खोकल्याची अशी कांहीं जबरदस्त उबळ आली कीं त्याचं सारं शरीर हादरूं लागलं! प्रत्येक वेळीं खोकला आला कीं तो म्हणे—"अल्लामदुलिल्ला!" ह्या म्हाताऱ्याशीं बोलायची संधि आतां मिळेल मग मिळेल म्हणून वाट पहात गांवकरी घुडघ्यांत मान घालून निमूट बसले होते. तरुण मंडळींची, दारात रांग लागली होती. या रुग्णाईत, निःस्तब्ध पाहुण्याबद्दल त्यांना एक शब्ददेखील कळलेला नव्हता. अन आतां तर त्याच्या खोल गेलेल्या डोळ्यांत झोप मावत नव्हती.

म्हाताऱ्याचा खोकला कांहीं केल्या थांबत नव्हता. उलट दरखेपेला तो अधिकच बळावू लागला. उबळहि वारंवार येऊ लागली. मग मात्र त्यानं हातानं खूण करून हसमनला जवळ बोलावलं—"या इथं, जवळ ये!' हसमन पुढं सरकला, तशी इतर वडिलधारी मंडळीदेखील हलकेच त्याच्या पाठराखणासाठीं सरकून पुढं झुकली. तरुण मंडळींची उत्सुकता शिगेला पोंचली होती. पण त पुढं सरकूं धजत नव्हते...मोठ्या शिकस्तीनं तो मुशाफिर आपल्या आगमनाचं कारण सांगत असेल, कदाचित् तो आपलं मृत्युपत्रहि लिहून घ्यायला सांगत असेल— कारण त्याच्या कानावर मधूनमधून हसमनचे शब्द येत होते, "चाचाजी! तुम्ही कशाला काळजी करतां? तुम्ही शांत मनानं झोपा पाहूं- आतां आम्ही त्याची नीट काळजी घेऊं!..." एकाएकी वडिलधारी मंडळी खाटेवर वाकली अन मग निःशब्द उभी राहिली.

हसमन पुटपुटला, 'तो अल्लाच्या भेटीला गेला.' शेकोटींतला एक ओंडका मोठा आवाज








करून फुटला अन मृताच्या चेहऱ्यावर झगझगीत प्रकाश टाकून त्यानं आपलं जीवितकार्य संपवलं. दूरवर एक गाय चांगलीच जोरानं विन्हळली.

आपली शेवटची इच्छा त्या मुशाफिरानं सांगून टाकली होती. "हिजाझ' साठीं त्यानं आठ सुवर्ण-भारिका बरोबर घेतल्या होत्या अन् त्या खोगिरात लपवलेल्या होत्या. ज्या करड्या गाढवावर बसून तो प्रवास करीत होता, तें करडें गाढवहि अल्लाच्या दूताला अर्पण करण्याचा त्याचा मनोदय होता !

दफनविधि आटोपून स्मशानांतून परत आल्यावर ते किसान ओट्यावर बसून विचार करूं लागले–त्या म्हाताऱ्याची शेवटची इच्छा कशी पुरी करावी ? आपल्या ताब्यांत मिळालेल्या या सोन्याच्या मोहरा अन हें करडें गाढव, यांचं काय करावं ? अखेरीस सर्वानुमतें ठरलं कीं, कुणी एकानं जिल्ह्याच्या गांवीं जावं अन् न्यायाधीशाचा सल्ला घ्यावा...एका आठवड्याच्या आंत हसमननंच स्वतः जावं, अन् जाताना तें गाढवहि आपल्याबरोबर न्यावं असं देखील नंतर एकमतानं निश्चित करण्यांत आलं.

आतां त्या चतुःष्पाद प्राण्याचं महत्व अतोनात वाढलं. जो तो आपल्या शेतांतलीं कणसं अन् घरांतल्या ताज्या भाकऱ्या त्याच्यापुढं आणून टाकूं लागला ! बरोबर ठरल्यावेळीं त्याला ठराविक खुराक मिळूं लागला–जणु कांही धार्मिक कर्तव्य बजावण्याच्या हिरीरीनें प्रत्येकजण तें काम करूं लागला. प्रत्येक किसान दुसऱ्याला विचारी, "त्या करड्या गाढवाला पाणी पाजलस ? बरं, त्याच्या दुपारच्या बार्लीचं काय ?"

एके दिवशीं सकाळीं रात्रीच्या अंधःकारांतून सप्तरंगांची उधळण सुरूं होतांच सर्व गांवकऱ्यांनीं जवळ जवळ चौकीपर्यंत जाऊन हसमन होजाला निरोप दिला. होजा ज्या गाढवावर बसला होता, त्यालाच तें करडें गाढवहि बांधलें होतें. मात्र करड्या गाढवाच्या पाठीवर कसलाही बोजा नसल्यानें ते अगदी खुषींत शेपूट हलवीत चाललें होतें. त्याच्या पाठीवरचं जाडंभरडं लोंकरी खोगीर उगवत्या सूर्याच्या सोनेरी किरणांत मखमली गालिचासारखं चकाकत होतं.

तो प्रवास मात्र विलक्षण कंटाळवाणा अन् प्रदीर्घ होता. भाताच्या अन् धान्याच्या हिरव्यागार शेतांपलिकडे तो शांत ओढा केव्हांच गडप होऊन गेला होता. उजाड माळरानांतून आणि डोंगरदऱ्यांतून दोन दिसस तो रस्ता कापीत होता; पण वाटेंत त्याला कांहीं एकादं खेडं, एकादी चक्की किंवा एकादा ओढादेखील लागला नाहीं. मग एका भयंकर खिंडींतून, खडकाळ चढण चढून तो डोंगरमाथ्यावर आला तेव्हां थंडगार वारा वहात होता, अन् खालचें सुंदर दृश्य दिसत होतें. सफरचंदांच्या बागांतुन वहाणारा छोटा ओढा एकाद्या तलवारीच्या पात्यासारखा चमकत होता. दोन्ही बाजूंना तारांचे उंच खांब, अदबीनें उभा असलेला गुळगुळीत रस्ता, वळणावळणानं डोंगरावरून उतरून खालीं गावांत गडप झाला होता. हसमननं ती रात्र एका खानावळींत काढली अन् सकाळींच तो जिल्ह्याच्या मुख्य ठाण्याच्या मार्गाला लागला.

या छोट्या राजधानीच्या गांवांत एक मोठा वाडा होता. वाड्याच्या मध्यभागीं एक उंच टॉवर अन् दर्शनी भागांत एक सज्जाहि होता. परंतु ह्या वाड्याचं बांधकाम पुरं झालं नव्हतं. मागील भिंतींतून मधूनमधून विटा डोकावत होत्या अन् दोन विटांच्यामध्यें किरमिजी कबुतरांनीं आपलीं बिऱ्हाडंहि थाटलीं होतीं. भिंतींना गिलावा नाहीं, खिडक्यांना तावदानं नाहींत, अशा थाटांत देखील तळमजला गजबजलेला दिसत होता. एका कोपऱ्यांत भलीमोठी चुन्याची भट्टी आणि कामगारांसाठीं बांधलेली पत्र्याची टपरी अजून दिसत होती.

अंगांत कोट नाहीं; डोक्यावर हॅट नाहीं, अशा थाटांत उभ्या असलेल्या हवालदारानं होजाला विचारलं, 'काय काम आहे ?'... मग 'नदीवरनं पाणी आणणाऱ्या मुलांनीं बातमी आणली...' इथपासून सुरुवात करून होजानं त्याला सारी कथा सांगायला सुरुवात केली ! ती अर्धीअधिक झाली असेल नसेल तोंच हवालदार आपल्या जागेवरनं उठले, त्यांनीं हातांतल्या भाकरीचे तुकडे जवळच्या तळ्यांतल्या बदकांच्या रोखानं टाकायला सुरुवात केली अन् वर सज्जांत एका टोंकाला बसून गुडगुडी पीत असलेल्या पगडबंद माणसाला विचारलं, "हाजी एफेन्दी, तुमचं काय म्हणणं आहे ? तुमची काय प्रातःकालीन करमणूक चालली आहे वाटतं !"

न्यायमूर्ति रजेवर इस्तंबूलला गेल्याचं समजल्यावरून जिल्हाधिकाऱ्यांना – आपलं काम सांगावं अशी हसमनची इच्छा होती. त्यानं जोडे दारापाशी काढून ठेवले, आतां त्याच्या पायात फक्त पवित्र मोजे होते–त्यांतून त्याच्या टांचा बाहेर डोकावत होत्या–भीत भीतच त्यानं आंत प्रवेश केला अन् दोन्ही हात पोटावर बांधून तो आपली कथा पुढं सांगूं लागला.

नाकांत बोलणाऱ्या दंतहीन जिल्हाधिकाऱ्यानं आपल्या मिशा रंगवलेल्या होत्या अन् एकेकाळीं जांभळ्या असलेल्या रंगाचं लिननचं जाकिट अंगांत घातलं होतं. शेवटपर्यंत ती कथा ऐकण्याइतकं त्याचं माथं शांत नसल्याकारणानं थोड्याच वेळांत तो ओरडला– "हवालदार !"

त्या छोट्या राजधानींत हसमन होजा पांच दिवस इकडून तिकडे भटकला. भेटेल त्याला आपलं मनोगत सांगूं लागला. हवालदार घड तें गाढव ठेवून घ्यायला तयार नव्हता, अन हसमनला परत नेऊं द्यायलाहि कबूल नव्हता ! मग कुणाला तरी त्याची कींव आली अन् तो म्हणाला, "अरे जाउं द्या त्याला परत ! दोन आठवड्यांनीं पुन्हां ये रे बाबा. खुद्द न्यायमूर्तींनाच काय तो निर्णय घेऊं द्या पाहूं !"

न्यायमूर्ति त्या भागांत विलक्षण विख्यात होते. कुठलाहि तंटा त्यांना सुटला नाहीं अन कुठलाहि गुंता त्यांना उलगडतां आला नाहीं, असं कधी होत नसे. नारिंगी रंगाच्या पायघोळ अंगरखा घालून आणि हातांत लाल भडक छत्री घेऊन बाजारांतून चक्कर मारण्याची त्यांना संवय होती. अगदी क्षुल्लक गोष्टीवरूनहि आपलं भलं मोठं पोट सांवरीत सांवरीत हंसायचीहि त्यांना खोड होती. या संवयीचंहि लोकांनीं कौतुक करावं, असं त्यांना वाटे.

पूर्वीच्याच रस्त्यानं, आपापला पूर्वीचाच दर्जा सांभाळीत तो माणूस आणि तें गाढव परतलं. त्या करड्या गाढवाच्या पाठड्यांत तर भरीला इतिहास आणि भावनात्मक वारसाहि होता ! पेंड आणि बार्ली हे पदार्थ राजधानींत फारच महागडे होते. तें कांहीहि







अनुक्रमणिका

असलं तरी त्या गाढवाला यथास्थित खाऊंपिऊं घालायलाच हवं होतं. गांव-पंचायतीला पण हा खर्च मुळींच अनाठायीं वाटला नाहीं. गांवकी म्हणाली, "पवित्र कामासाठीं नियुक्त केलेलं गाढव आहे तें! त्याची काळजी घेणं हें आपलं परमकर्तव्य होय." थकल्या-भागल्याबद्दलची यत्किंचितहि तक्रार हसनमननं केली नाहीं अन् योग्य तेंच करण्याचा आपण आटोकाट प्रयत्न केला, या समाधानांतच तो प्रवासांतली दगदग विसरला.

दुसऱ्यांदा राजधानीहून परत येतानाहि पुन्हां गाढवाला बरोबरच आणावं लागलं. न्यायमूर्ती अद्याप परत आलेले नव्हते. अन होजाला समोर पहातांच तो हवालदार ओरडला, "मूर्खा, एवढी कसली घाई झालीय रे तुला?..." आतां अशा रीतीनें पवित्र कार्यासाठीं मुक्रर केलेल्या गाढवाला नेहमींच्या उपयुक्त कामाला जुंपावं कीं नाहीं यावर त्यांनीं तें तसंच मोकळं सोडून द्यायचं ठरवलं.

तिसऱ्या प्रवासाचाहि शेवट तोच झाला. माणसामागून गाढव आपलं येतंय! दूर-दृष्टि असलेल्या एका किसानानं लांबूनच तें करडं गाढव ओळखलं अन सबंध गांवाला बातमी देऊन टाकली. लोक आश्चर्यचकित होत्साते, त्यांची मार्गप्रतिक्षा करूं लागले. आपल्या गाढवावरनं खालीं न उतरतांच हसमन मोठ्या आनंदानं म्हणाला, "यावेळीं आम्ही काय केलं, ठाऊक आहे? आम्ही यावेळीं खरं म्हणजे एक साक्षीदार बरोबर न्यायला पाहिजे होता!"

साक्षीदार!—ही गोष्ट पहिल्यांदाच कशी नाहीं आली आपल्या लक्षांत? तरी हरकत नाहीं! अजून कांहीं नुकसान झालेलं नाहीं. पुढच्या आठवड्यांत न्यायमूर्ति खात्रीनं शिफारसपत्र लिहून देतील, गाढवाचा स्वीकार करतील-त्यावेळीं तिघंजण राजधानीला जातील, अन जरूर पडलीच तर 'देवाशपथ' खरं सांगतील!

नुसतं खाऊन खाऊन, आणि ठराविक अंतरानें या वाऱ्या विनओझ्यानं करून करून तें करडं गाढव आतां चांगलंच पुष्ट झालं होतं. गाढविणींना पाणी पाजण्यासाठीं ओढ्यावर नेण्यांत येई, तव्हां तें त्यांच्या मागें धावे आणि माथेफिरूसारखं वर्तन करी!

असे अडीच महिने गेले.

अखेरीस शेवटच्या सफरीची सगळी तयारी झाली. सारे गांवकरी त्यांना निरोप द्यायला चक्कीपर्यंत आले, तेव्हां या छोट्याशा मिरवणुकीत उडविलेल्या धुळींतूनहि उग-वत्या सूर्याची किरणं चकाकत होती. ती मिरवणूक जशी डोंगरमाथा चढूं लागली तशी मागे उरलेल्यांना वाटूं लागलं कीं हे धुळीचे लोट आतां आभाळाला भिडताहेत.

या खेपेला ते करडं गाढव कांहीं परतलं नाहीं. राजधानीहून आणलेल्या शिफारसपत्रा-वरून आणि त्यावरील सीलबंद मोहरा पाहून गांवकऱ्यांची खात्री झाली कीं, ते गाढव आतां मक्केच्या विहिरींतलं पवित्र जल घेऊन संथ-पणें, कुठल्याहि प्रकारचं दुःखमय ओझं न वहातां, सगळीकडून वाजवी मानाचे मुजरे घेत घेत हिजाझच्या धार्मिक यात्रेला निघालं असावं... हसमनला एके दिवशी स्वप्नांत त्या गाढवाचं खोगीर पवित्र अशा हिरव्या मख-मलीनं मढवलेलं दिसलं; त्यामुळं तर गांव-कऱ्यांची श्रद्धा चांगलीच दृढ झाली.

[पान ३८ वर]

अनुक्रमणिका








# अदृश्य घाव

**करौली किस्फ्लुदी** *या अग्रगण्य हंगेरियन लेखकाच्या सुंदर कथेचा तितकाच सुंदर अनुवाद* **श्रीं. गोपालकृष्ण भोबे** *यांनीं केला आहे.*

गुलाबी झोंपेची धुंदी नुकतीच कुठें चढते आहे, अशा वेळीं नेमका तिच्यांत व्यत्यय येणें ही गोष्ट डॉक्टरांच्या आयुष्यांत नित्याची होऊन बसली होती; पण आज रामप्रहरहि टळला नव्हता आणि एकाएकीं नोकरानें मारलेल्या हांका ऐकून डॉक्टर खडबडून जागे झाले. "साहेब, साहेब बाहेर एक रोगी आलेला आहे. एक मिनीट अधिक उशीर केलात तर दुखणं हाताबाहेर जाईल असं तो म्हणतो. साहेब, तो सारखा विव्हळतोय !"

"त्याला तपासायच्या खोलींत नेवून बसव. मी आलोंच कपडे बदलून; जा !"

कपडे बदलायच्या खोलींतून डॉक्टरानीं समोरच्या-रोग्यांना तपासायच्या खोलींत येऊन उभें राहिलेल्या माणसाकडे पाहिलें. रोगी सामान्य नव्हता. त्याचें एकंदर व्यक्तित्व तो चांगल्या उच्च कुळांतील असावा असेंच दर्शविणारे होतें. त्याचा उजवा हात बँडेजनें बांधला होता. त्याला होणाऱ्या यातना तो अतिशय निग्रहानें सहन करीत असला पाहिजे. चेहऱ्यावरचे स्नायू ताणून तो फक्त कण्हत होता.

"बसा बसा, मी आपली काय सेवा करूं ?" एप्रनची बटनें लावीत डॉक्टरांनी त्या रोग्याला बसायला सांगितलं. "जवळ जवळ एक आठवडा झाला, या दुखण्यांनं मला झोपूं दिलं नाहीं. माझा हा उजवा हात एकसारखा ठणकतो आहे. मला काय होतं हेंच मला कळत नाहीं. तो कॅन्सर आहे किंवा अन्य कोणता भयंकर आजार आहे याचाहि पत्ता लागत नाहीं. सुरुवाती सुरुवातीला मी त्याकडे लक्ष दिलं नाहीं; पण कांहीं दिवसांनी जळजळ खूपच वाढली. मला ही गोष्ट अतिशय जाचूं लागली. प्रतिक्षणीं दुःख वाढूं लागलं आणि आतां तर तें सहनशक्तीच्या बाहेर गेलेलं आहे. हें दुःख मला गिळून टाकूं पहात आहे डॉक्टर; ग्रासून टाकूं पाहात आहे. आणखी एक तास गेला तर खरोखर मी वेडा होईन. केवळ हें आपल्याला दाखवावं म्हणून मी या शहरांत आलों. आपण माझ्या हाताचा हा दुःख देणारा भाग जाळून तरी टाका, किंवा कापून तरी काढा. काय उचित दिसेल तें करा; विलंब लावूं नका !"

"असा त्रागा करूं नका. धीर धरा. काळजी करूं नका. आपण तपासून पाहूं" आणि असें म्हणून डॉक्टरांनीं रोग्याचा तो हात आणि सर्व शरीर अगदी बारीक तपासून पाहिलें. आणि एक सुस्कारा सोडून ते म्हणाले– "तुमच्या हाताला किंवा एकंदर शरीराला कोणत्याच प्रकारचं दुखणं किंवा रोग झालेला मला दिसत नाहीं !" आपले

( एक आफ्रिकन पद्य-कथा )

# काळ्या शाईचा माणूस

मी एक निग्रो आहे.
काळाकुळकुळीत जणू काळरात्र.
माझा जखमी आफ्रिका काळी शाई आहे.
आणि मी एक शाईचा माणूस आहे.
काळ्या शाईचा काळा माणूस.
मी आहे जन्मजात गुलाम.
सीजरकडे मी चाकरी केली आहे.
वॉशिंग्टनचे मी जोडे पुसले आहेत.
चालू आहे माझं दास्य युगानयुगं.
अजूनहि मी राबत आहे.
माझ्या हातून बनलेले सर्व पिरामीड.
बुलवर्थ इमारतीचा चुना मी मळला.
अनेक शतकांची कथा आहे माझी चाकरी.
आज मी गात आहे.
आफ्रिकेपासून जार्जियापर्यन्त
माझं रडगाणं घुमत आहे.
पण ऐकायला कुणी नाहीं.
माझं गीत एक फूल होतं.
आज त्याचं निर्माल्य झालं आहे.
मी अनेकांची शिकार झालों.
कांगोमध्यें बेल्जियननीं माझे हात तोडले.
गोऱ्या हातांनीं मांझी काळी कातडी काळीनिळी केली.
आजहि टेक्सासमध्यें
प्रत्येक दरवाजाजवळ एक काळा कुत्रा आहे.
—एक निग्रो काळा कुळकुळीत.
एक काळ्या शाईचा काळा माणूस.

••••

—लॅंग्स्टन ह्यूज
अनुवादकः—जयवन्त गुजर

विव्हळणें एकदम वाढवून आणि प्रत्येक शब्दावर जोर देत तो माणूस काकुळतीने बोलूं लागला— "असं म्हणूं नका डॉक्टर, असं म्हणूं नका. माझ्या हाताचा हा भाग तुम्हांला कापावाच लागेल. केवळ तुम्हींच ही गोष्ट करूं शकाल म्हणून मी इतक्या लांबून इथं आलों. मला निराश करूं नका डॉक्टर; मला निराश करूं नका. दारूण यातना देणारा हा हाताचा भाग कापून टाकल्याशिवाय मला स्वस्थता लाभणार नाहीं." आणि आपल्या हाताला बांधलेलें बँडेज भराभर सोडीत तो म्हणाला, 'माझ्या हातावर कोणत्याच तऱ्हेची जखम किंवा रोगाचं कुठलंच लक्षण नाहीं म्हणून तुम्ही आश्चर्य मानू नका. माझी अवस्था अतिशय शोचनीय झालेली आहे.'

'हें पहा विस्मयचकित करून सोडणाऱ्या गोष्टी माझ्या आयुष्यांत प्रतिदिनी घडत असतात. त्यामुळे असं हबकून जाण्याचं मला कोणतंच कारण नाहीं' असं म्हणून डॉक्टरानीं पुन्हां एकदां तपासून पाहिलें; परंतु रोगाचं कसलंच लक्षण त्याना आढळलं नाहीं. त्याचा हात आपल्या हातांत घेऊन त्यांनीं तो एकदां वर खालीं केला आणि एकदम झटकल्यासारखा सोडूनहि दिला. तसा तो झटकल्यानंतर त्या रोग्यानें भयंकर चित्कार केला. डॉक्टरांना देखील वाईट वाटलें. आपण तसें झटकायला नको होतें, असें त्यांना वाटलें त्यांना दया आली. 'बरं मला असं सांगा, तुम्हांला नक्की कोणत्या ठिकाणी वेदना होतात.'

"या या इथं" असं म्हणून स्वतःच्या तर्जनीनें हलुवारपणें एक वर्तुळ त्या जागेंत काढीत तो म्हणाला. डॉक्टरनीं त्या जागेला स्पर्श करायचा प्रयत्न केला तोंच त्यानें पुन्हां एकदां कळवळून आरोळी मारली.

"अद्भुत आहे. मला तरी कांहीं दिसत नाहीं आणि तुम्हीं दुःखानं आरोळ्या मारतां. मीं जरासं बोट लावायच्या प्रयत्न केला तेव्हां तुम्हांला कांहीं भास झाला काय ?"

रोग्यानें उत्तर केलें नाहीं. फक्त त्याच्या डोळ्यांतून घळघळ अश्रु वाहात होते. डॉक्टरांना तें सहन झालें नाहीं. त्यांनीं आणखीन एकदां त्याची नसन् नस तपासली. त्वचा तपासली. रक्तदाब पाहिला. तापमान पाहिलं. सर्व कांहीं ठीक होतें. एखाद्या उत्तम आरोग्यवान माणसासारखें. भल्या पहाटेच एका विक्षिप्त माणसाशीं आपली गांठ पडली असें डॉक्टरांना आतां वाटूं लागलें; पण तो विचार तेवढ्याच वेगानें झटकून ते म्हणाले—

"हें पहा तुम्हांला या शहरांत एक आठवडाभर तरी राहावं लागेल. इतक्या लवकर मी कांहींहि निर्णय घेऊं शकत नाहीं."

"नका नका डॉक्टर, असं करूं नका ! आणखी एका क्षणाची देखील मी वाट पाहूं शकत नाहीं. आणखी कांहीं क्षण असेच गेले तर मी वेडा होईन. या अदृष्य घावानं मला भयंकर वेदना होत आहेत. हाडापर्यंत हा भाग कापून काढा. आत्तांचे आत्तां काढा. विलंब लावूं नका."

'मी तसं करूं शकत नाहीं.'

'कां करूं शकत नाहीं ?'

'कारण ज्या भागाला कुठलीच तऱ्हेचा रोग वा दोष नाहीं तो भाग विनाकारण कापणं हा [illegible] आहे आणि मी तो करणार नाहीं।'





" कसं सांगूं तुम्हांला ? कसं पटवून देऊं ? मला ठावूक आहे तुम्हांला मी विक्षिप्त वाटतों, वेडा वाटतों. कदाचित माझ्या या कृतींत कांहीं तरी धोका आहे असं तुम्हांला वाटतं, पण तुम्ही असा संशय घेऊं नका. हें पहा. " असं म्हणून खिशांतून एक हजाराच्या नोटा काढून तिथल्या टेबलावर ठेवीत तो म्हणाला.--

' ही घ्या तुमची फी, आणि करा आतां त्या भागाचं ऑपरेशन. '

' ठेवा ते पैसे खिशांत. सारं ब्रह्मांड तुम्हीं माझ्यासमोर उभं केलंत तरी तुम्हीं म्हणतां ती गोष्ट मी करणार नाहीं. माझ्या व्यवसायाच्या नीतिविरुद्ध आहे हें. उद्यां सारं जग तुम्हांला तर मूर्खांत काढीलच, पण तुमच्या असहाय्यतेचा फायदा मी घेतला म्हणून मला अपराधी ठरवील. माझ्याबद्दल शंका घेईल. '

' ठीक आहे. इतकं सांगूनहि तुम्हीं ऐकणार नाहीं म्हणतां, मग इलाजच खुंटला. आतां एवढं तरी करा–मी स्वतः माझ्या हातावरचा तो भाग कापून काढतो. माझा डावा हात तेवढ्या सफाईनें हें काम करूं शकणार नाहीं; पण कापल्यानंतर जी कांहीं क्रिया असते ती करायला तरी नाहीं म्हणूं नका. एवढी विनंति ऐकाच ! '

असं म्हणून आपल्या खिशांतून त्यानें एक धारदार चाकू काढला. शर्टाची बाही खसकन् ओढून फाडून काढली आणि जिथें कळा येतात असं त्यानं मघाशीं सांगितलें होतें त्या भागावर डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच चाकू खुपसूनहि टाकला. आपल्या डोळ्यां-समोर हें काय घडतें आहे हें डॉक्टरांना कळेना. ते हतबुद्ध झाले. न जाणो एखादी नस कापली जाऊन भलती आपत्ती ओढवायची या भीतीने ते ओरडले—' अरे थांबा थांबा, हं काय चालवलंय तुम्ही ! थांबा, असे अनावर होऊं नका. तुम्हीं असे उतावीळ झालांच आहांत तर करतो मी ऑपरेशन ! चला. '

डॉक्टरांनी ऑपरेशनची तयारी केली. ऑपरेशनची जागा बधीर करून झाल्यानंतर त्यांनी रोग्याला सांगितलं--' तुम्हीं आपली मान डाव्या बाजूला वळवा. या बाजूला पाहूं नका ! '

' कां ? '

' त्याचं असं आहे, एखाद्याला नुसतं रक्त पाहिल्यानंतर चक्कर येते. कांहीं कांहीं माणसं बेशुद्ध देखील होतात. आणि मी तर खुद्द तुम-च्याच हाताचा भाग कापतों आहे.... ! '

' तुम्ही काळजी करूं नका डॉक्टर. कुठून कुठपर्यंत कापायचं याचं मी तुम्हांला निर्देशन करीन ! ' आणि डॉक्टरांनीं ऑपरेशन पुरें करीपर्यंत तो डॉक्टरांना सहाय्य करीत राहिला. त्याचा शरीराचा भाग जरादेखील कांपला नाहीं किंबहुना खुशींत येऊन शरीरावरचा एक फार मोठा बोजा उतरविल्यासारखा त्यानें दीर्घ निःश्वास सोडला.

' कळा थांबल्या कां ? "

' हो ! मघासच्यासारखा त्रास बिलकूल होत नाहीं ! मला तर असं वाटतं कीं जणुं माझं दुःख शस्त्रानं कापून आपण फेंकून दिलेलं आहे. एखाद्या कोंदलेल्या जागेंत शीतल वारा येऊन शांत शांत वाटावं तसं मला वाटतं आहे. '

ऑपरेशनचा सर्व विधि पुरा झाल्यावर कृतकृत्य झाल्याच्या आनंदानें त्यानें आपल्या डाव्या हातानें डॉक्टरचा हात आपल्या हातांत घेऊन कृतज्ञतेनें घट्ट दाबून धरला आणि भरल्या आवाजांत तो म्हणाला--

' डॉक्टर, डॉक्टर कोणत्या शब्दांनीं मी आपले आभार मानूं ?'

शहरांतल्या एका पहिल्या दर्जाच्या हॉटेलांत तो राहिला. ज्या वेळीं डॉक्टर त्याच्या चौकशीला जात त्या त्या वेळीं त्याच्या वर्तनांतून एक आगळा श्रेष्ठपणा, घरंदाजपणा, उच्च विचारसरणी इत्यादि गोष्टी प्रतीत होत होत्या. एका आठवड्याच्या आंतच डॉक्ट-रांनीं त्याला परत जायची परवानगी दिली.

× × ×

तीन आठवड्यानंतर असाच रामप्रहरी तो परत आला. त्याचा चेहरा पांढरा फटक पडला होता, अंगातून घामाच्या धारा वहात होत्या. घामाघूम होणारा आपला चेहरा तो वारंवार पुसत होता. आल्याबरोबर आपलें शरीर त्यानें तिथल्या आराम खुर्चीवर लोटून दिलं. डॉक्टर आल्याबरोबर कांहींहि न बोलतां ऑपरेशन केलेला आपला उजवा हात त्यानें डॉक्टरांच्या नजरेसमोर धरला.

'कां, काय झालं ?'

'मला वाटतं–डॉक्टर, तुम्ही ऑपरेशन बरोबर केलेलं नसावं. अगदीं खोलपर्यंत–जिथून मला वेदना होत होत्या तिथपर्यंतचा भाग कापला गेला नसावा. त्यावेळीं तात्पुरतं मला बरं वाटलं, पण गेल्या आठवड्यापासून या भागाचा ठणका एवढा वाढलाय कीं ही वेदना पुन्हां माझ्या सहनशक्तीच्या बाहेर जाऊं लागलेली आहे. म्हणून म्हणतों पुन्हां एकदां तो भाग अगदीं खोलपर्यंत कापून टाका.'

डॉक्टरांनीं पाहिलें–ऑपरेशनचा तो भाग पूर्णपणें बरा झाला होता. त्याच्या सर्व शरीरक्रिया उत्तम चालू होत्या. तपासून झाल्यावर डॉक्टर म्हणाले,–'आपण ऑपरेशनशिवाय एखादा अन्य इलाज करून पाहूं या काय ? '

'नको नको डॉक्टर, तुम्हीं जर तो भाग मी म्हणतो त्याप्रमाणें कापून टाकला नाहीं तर माझा हा हात मी दंडासकट सुरीनें कापून टाकीन-- बोला करतां कीं नाहीं मी म्हणतों त्याप्रमाणें ?'

डॉक्टरांनी खूप विचार केला आणि ऑपरेशनची सिद्धता करून रोगी म्हणेल त्याप्रमाणें फिरून एकदां त्याचें– त्या हाताच्या भागाचें ऑपरेशन करून टाकलें.

जातां जातां तो म्हणाला–'मला वाटतं आणखी एक–दीड महिन्या-नंतर पुन्हां मला याच कामासाठी इथं यावं लागेल !'

'म्हणजे ! आपण असं कां म्हणतां ?'

' बरोबर सांगतोय मी. परमेश्वराच्या अस्तित्वाइतकीच ही गोष्ट सत्य आहे डॉक्टर !'

या निश्मयकारक घटनेची डॉक्टरांनी आपल्या अन्य समव्यव-सायी मित्रांशीं चर्चा करून पाहिली, पण सर्वांनीच [illegible] नीति नेति अशीच भावना व्यक्त केली.










असेच एक दोन महिने लोटले. तो रोगी परत आला नाहीं. दोन महिन्यांनी डॉक्टरांच्या नांवे त्याचें एक जाडजूड रजिस्टर्ड पत्र आलें. डॉक्टरांना वाटलें बहुधा आपलें दुखणें आतां तो विसरून गेला असावा आणि त्याची प्रचीति म्हणजेच हें पत्र असावं. डॉक्टरांनी उत्साहानें तें पत्र फोडले. पत्र फार मोठें होतें. त्यानें लिहिलें होतें--

'प्रिय डॉक्टरसाहेब, आपण माझी वाट पहात असाल. दोन वेळां आलों. आतां तिसऱ्यांदा हा वेडा आलाच पाहिजे असा विचार आपल्या डोक्यांत आलाहि असेल, पण आपल्यासारख्या अत्यंत गोड माणसाला माझ्या रोगाच्या बाबतींत मी अधिक संभ्रमांत ठेवूं इच्छित नाहीं. माझ्या वेदनांचें गुपित मी आतां स्पष्ट करतो. एक महिना उलटल्यानंतर मला पहिल्यासारख्याच वेदना होऊं लागल्या. त्या तिप्पटीनें वाढल्याहि पण मी त्यावर स्वतःच इलाज केला. घाबरूं नका डॉक्टर, हात कापायच्या भानगडींत मी पडलो नाहीं. नाहींतर मला हें पत्र लिहितां आलं असतं का ? काट्यानें काटा काढावा, विषानें विष मारावं तसंच त्या जळजळणाऱ्या भागावर मी एक जळता निखारा ठेवून दिलाय तो विझाला रे विझला कीं पुन्हां आणखी एक जळता निखारा ठेवून देतों. मग वेदना थांबतात !'

'डॉक्टर, सहा महिन्यापूर्वीची गोष्ट–सहा महिन्यापूर्वी मी एक अत्यंत सुखी माणूस होतो. वाडवडिलांनी ठेवलेल्या लाखों रुपयांच्या संपत्तीचा मी एकुलता एक वारस. या संपत्तींतल्या प्रत्येक वस्तूचा मी डोळेसपणें उपभोग घेत होतो. या परगण्यांत तुलनेनं माझ्या एवढा जहागिरदार दुसरा कुणी नसावा, नव्हे--दुसरा कुणी नाहींच ! एका वर्षापूर्वी माझं लग्न झालं. माझी पत्नी शंभर स्त्रियांत उठून दिसेल अशी देखणी होती. तशीच ती अत्यंत दयाळु, क्षमाशील आणि शांत होती. मजवर तिचं अमर्याद प्रेम होतं. लग्नानंतरचे सहा महिने मी पृथ्वीवर नव्हतों. स्वर्गांत होतों. स्वर्गसुखाचीं सर्व वर्णनं माझ्या वांट्याला आलीं होतीं. प्रत्येक दिवस नवा हर्ष घेऊन उजाडे आणि विलक्षण तृप्तींत मावळे.'

"नजिकच्या दुसऱ्या एका परगण्यांत दुसरे एक जहागिरदार राहतात. त्यांची पत्नी, ही माझ्या बायकोची जिवाभावाची मैत्रीण. अधूनमधून आम्हीं दोघं या जहागिरदारीणबाईकडे जात असूं. तसा आमचा त्यांचा मुळचा घरोबा होताच, पण माझ्या पत्नीच्या मैत्रीमुळें त्यांत भरच पडली, परंतु माझी पत्नी तिथें गेली तरी दोन तासांच्या-वर केव्हांहि थांबली नाहीं. त्या घरांतल्या पुरुषांशीं ती केव्हांहि बोलली नाहीं. परपुरुषाशीं बोलणें हें देखील ती पाप समजत असे. एखाद्या नृत्यसमारंभातहि ती मला सोडून दुसऱ्या पुरुषाबरोबर कधींहि नाचली नाहीं. एक पापभिरू, अबोध बालकासारख्या, निरागस स्वभावाची अशी माझी पत्नी होती."

"सुख उतूं जाऊं लागलं कीं तें खुपूं लागतं. अतिप्रेम किंवा अतिसुख हें केव्हां केव्हां घातुकहि असतं. संशय–पिशाच्चं भंवतीं भंवतीं घोटाळत असतातच. याच्या मानगुटीवर केव्हां एकदां बसतो याची ती वाटच पाहात असतात. आणि मग त्यांच्या आहारीं जाऊन केव्हां केव्हां माणसं आपल्या हातानं आपला नाश करून घेतात. माझंहि तसंच झालं.

"माझ्या पत्नीचं एक शिलाईचं पायमशीन होतं. या मशीनच्या बैठकीला एक मोठा खण होता. या खणांत ती शिलाईचें सर्व सामान ठेवीत असे. मात्र त्या खणाची चावी ती जिवापलीकडे जपत असे. मला उगाचच संशय आला. मी तिला तसं विचारलं देखील. पण ती म्हणाला होती कीं 'त्याला कारण कोणतंच नाही.' माझाहि विश्वास बसला, पण मनांत किंतु राहिला. या किंतूचा हळूहळू राक्षस बनूं लागला. त्या टेबलाचा तो खण उघडून पाहाण्याची माझी इच्छा अनावर होऊं लागली. तिच्या चुंबना-आलिंगनांत–ती उत्कट असून देखील–मला चोरटेपणाचा वास येऊं लागला. कांहीं तरी कपट आहे, धोका आहे असं मला सारखं वाटूं लागलं. संशय–पिशाच्चानें माझ्या मानगुटीवरचं आपलं आसन पक्कं केलं."

'एका दिवशीं तिची ती मैत्रीण–ती जहागिरदारीण–स्वतःची गाडी घेऊन आम्हां उभयतांना आपल्याकडे घेऊन जायला आली. मी डोकं दुखण्याचं निमित्त करून घरीं राहिलों. माझी पत्नी मला अशा स्थितींत सोडून जायला तयार नव्हती, पण 'एवढी ती मुद्दाम आपल्याकडे आलेली आहे. तूं एक दोन तास जाऊन ये, मला कांहीं फार त्रास होत नाहीं, असं सांगून मी तिला पाठवून दिली. जातांना एक करूण दृष्टिक्षेप माझ्यावर टाकून अत्यंत अनिच्छेनं ती तिच्याबरोबर निघून गेली.'

'आमच्या फाटकाबाहेर गाडी गेली नाहीं तोच आमच्या घरांतला किल्ल्यांचा जुडगा घेऊन मी तो खण उघडण्याचा प्रयत्न करूं लागलो.








अनुक्रमणिका

आणि सुदैवानं त्यांतली एक किल्ली बरोबर लागून पटकन् खण उघडला. त्यांत वस्तु फारच थोड्या होत्या. मी भराभर खणांतल्या वस्तु बाजूला करूं लागलों. अगदीं टोंकाला उजव्या बाजूला रेशमाच्या सुगंधी कपड्यांत बांधलेलं एक बंडल होतं. मी तें पुडकं काढून सोडून पाहिलं–आणि काय आश्चर्य– माझ्या एका निकटवर्तियानें आपल्या प्रेयसीला उद्देशून लिहिलेलीं तीं प्रेमपत्रें होतीं.

प्राणप्रिये, जिवलगे, हृदयेश्वरी अशा संबोधनानें तीं सुरूं होत होतीं. मी तीं सर्व पत्रें वाचून काढलीं. प्रत्येक पत्राबरोबर माझ्या हृदयांतला सैतान वाढत होता. पत्रावरची तारीख माझ्या लग्नानंतरची होती. पत्र लेखकानं आपल्या प्रत्येक पत्रांत पत्नीला चोरून कसं प्रेम करावं याचं शिक्षण दिलेलंच होतं; किंबहुना आपल्या प्रेममार्गातला नवऱ्याचा कांटा कसा काढायचा याबद्दलचीहि शिकवण दिली होती.

माझ्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन भिडली. मी किती भ्रमांत होतों, स्वतःला अत्यंत सुखी समजण्यांत मीं केवढी मोठी घोडचूक केली होती. अमृत समजून मीं शेवटच्या थेंबापर्यंत विष प्यायलों होतों. मी तीं सर्व पत्रें जशींच्या तशींच त्या सुगंधी रेशमी कपड्यांत लपेटलीं; होती तिथं ठेवून दिलीं; आणि खणाला चावी लावून मी माझ्या खोलींत येऊन स्वस्थ बसलों'.

'मला वचन दिल्याप्रमाणें दोन तासांतच ती परत आली. आल्याबरोबर मला घट्ट मिठी मारून माझ्या प्रकृतीची तिनं चौकशी केली. माझी भराभर चुंबनं घेतलीं. दोन तास विरह सहन करावा लागल्याबद्दल आपल्या मैत्रिणीला तिनं दोष दिला. नेहेमींच्या त्याच निरागस वृत्तीनं माझ्या अंगावर ती खेळत होती. अगदीं निष्पापपणें. अगदीं भोळेपणें. आणि मीहि माझ्या अंतरांत वाढणारं संशय पिशाच्च तिच्यासमोर उघडं केलं नाहीं. पूर्वीसारखाच वागत राहिलों, परंतु माझ्या शरीरावर विखारी अंमल चढत चालला होता. थोडा वेळ आम्हीं बोलत बसलों.'

'रात्रीं झोपायच्यावेळीं ती पुन्हां पुन्हां मला विचारीत होती 'माझा राग नाहीं ना आला ? गडे, तुमच्या वर्तनांत मला थःडासा फरक कां वाटतो ? किंवा माझीच चुकीची समजूत असेल. मी तुमचं डोकं चेपूं कां ?' वगैरे; पण मी तिला तसं कांहीं भासूं दिलं नाहीं. पुढें तीं एकाद्या लहान मुलासारखी शांतपणें झोपीं गेली. माझा संशयात्मा पुन्हां जागा झाला. पत्रांतलीं ती गोड गोड विशेषणें, तीं नवऱ्याला कसं फसवावं याबद्दलची कोटकें, आणि नवऱ्याचा काटा कसा काढावा याबद्दलचे व्यूह......... कैदाशिणी, नीच, हलकट, पापिणी दुराचारिणी, कुलटे– तूं नवऱ्याचा काटा काढणार काय ? त्यापेक्षां........'

'मी उठलों, दोन तीन फेऱ्या घातल्या. क्षणोक्षणीं सैतान माझी मानगुट धरून आवळत होता. जें करावयाचें तें लवकर करून टाकण्याबद्दल मला बजावित होता. मध्यरात्र टळून गेली होती. मी पलंगाजवळ आलों, ती शांतपणें झोपली होती. तिच्या ओंठावर स्मिताची एक बारीक लकेर होती. मला वाटलं आपल्या प्रियकराच्या बाहुपाशांतलं सुखस्वप्न ती यावेळीं अनुभवीत असावी.

एकाएकीं माझी अस्मिता जागृत झाली. तिच्या प्रियकराला मी ओळखत होतों. माझ्यासमोर तो एक किरकोळ माणूस होता. मी एवढा मोठा जहागिरदार. मी वाटेल तें करूं शकत होतों. तो










फिरकोळ माणूस माझा काटा काढायचा व्यूह रचतो काय ? आणि ही नाजुक बाहुली त्याला साथ देणार ? माझ्याशीं कपटी प्रेमाचं नाटक करून मला फसवणार...मला ? एका अगणित संपत्तीच्या मालकाला ? हिला आणि हिच्या प्रियकरालाच काय; पण हिच्या प्रेमाच्या मार्गांतले डझनभर सहाय्यक जरी असले तरी त्या सर्वांना एकामागून एक परलोकीं पाठवायची माझी ताकद होती...पण तसं कशाला–आधीं त्या चोरट्या प्रेमाचं हें मूळच नाहींसं करतों. मग बाकीचे.'

"माझ्या नसानसांत खून संचारला होता. मीं तिच्या जवळ गेलों. माझा उजव्या हाताच्या पंजा शक्य तितका ताणला आणि तिच्या गोरटेल्या नाजुक गळयावर ठेवून सर्व शक्ति एकवटून करकचून मी तिचा गळा आवळला. एक क्षणभर तिनं डोळे उघडले. विस्मयपूर्वक माझ्याकडे पाहिलं. तिच्या ओठावरची मूळची स्मिताची रेषा थोडीशी विस्फारली; आणि फिरून तिनं डोळे बंद केले ते कायमचेच. स्वतःचा जीव वाचवायला तिनं कोणत्याच प्रकारची धडपड केली नाहीं. कसलाच प्रतिकार केला नाहीं. आपला हात देखील हलवला नाहीं. मात्र तिच्या तोंडांतून रक्ताची एक चिळकांडी उडाली आणि त्याचा एक थेंब माझ्या दंडावर पडला. त्याच जागेवर–जी जागा मी दोन वेळां आपल्याकडून कापून घेतली :आणि आतां पेटत्या निखाऱ्यानं ती जाळतों आहे–त्याच जागेवर. दुसऱ्या दिवशीं मी तिची उत्तरक्रिया केली. मला विचारणारा कुणीहि नव्हता, किंवा चौकशी व्हायची भीतीहि नव्हती. मी जें कृत्य केलं होतं तें माझ्या दृष्टीनं समर्थनीय होतं. तसं पाहिलं तर माझं हें कृत्य म्हणजे पशुतुल्य होतं. अत्यंत निर्दयतेनं मी क्रूरतेचा व्यवहार खेळलों होतों; परंतु तिच्यासारख्या बदफैली स्त्रीला जी शिक्षा मिळाली ती नियतीनेंच तिला दिली असा मी माझा समज करून घेतला. 'तिच्या नातेवाईकांनी किंवा अन्य हितचिंतकांनी तिच्या बाबतींत मला कांहींहि विचारायचा प्रयत्न करूं नये, माझी मनःस्थिति ठीक नाहीं' असें एका स्थानिक वृत्तपत्रांत मीं जाहीरहि करून टाकलं.'

"दुसऱ्या दिवशीं तिची ती जहागिरदारीण मैत्रीण भयंकर शोक करीत माझ्याकडे आली. माझ्या पत्नीच्या मृत्यूचा शोक तिची एखादी सख्खी बहीण मरावी अशा रीतीनें ती करीत होती. आपलं सर्वस्व नाहींसं झालं असं ती वारंवार म्हणत होती. मी मान फिरवून आरामखुर्चीवर गप्प बसून राहिलों होतों. थोड्या वेळानें तिनं माझा हात आपल्या हातांत घेतला आणि ती म्हणाली,

'तुम्हांला मी एक विनंति करूं काय ?'

'बोला'

'प्राण जाईपर्यंत ही गोष्ट कुणाशीं बोलणार नाहीं असं मला वचन द्या ?'

मला वाटलं माझ्या पत्नीच्या प्रेम-प्रकरणांतील रहस्यावर ती आणखी थोडा प्रकाश टाकणार असेल. निदान मी केलं तें शतकृत्य होतं याचं तरी मला समाधान लाभेल; म्हणून मी तिला एकदम तसं वचन दिलं. ती म्हणाली—

'तुमच्या पत्नीजवळ सुगंधी रेशमी कपड्यांत गुंडाळलेलं एक पत्रांचं बंडल मी दिलं होतं. कांहीं कारणामुळें तीं पत्रं मी माझ्या घरांत ठेवूं शकत नव्हतें. कृपा करून माझा तो ठेवा मला परत द्याल काय ?'

तिची ती मागणी ऐकून माझं सारं शरीर एका विचित्र शंकेनं कापूं लागलं. माझा घसा कोरडा पडला, पण उसन्या अवसानानं मी तिला विचारलं–'त्या पत्रांत काय लिहिलं होतं ?' ती घाबरली; पण माझ्या वचनावर तिचा विश्वास असल्यानं तीं पत्रं आपल्या प्रियकराचीं असल्याचं तिनं मला सांगितलं आणि—

'तुमच्या प्रेमळ, सुशील पत्नीइतकी विश्वासू स्त्री आणखी दुसरी मला कुणी आढळली नाहीं. म्हणून मी तीं तिच्याजवळ ठेवायला दिलीं होतीं. एका सुगंधी रेशमी कपड्यांत गुंडाळलेलीं तीं पत्रं तिनं आपल्या शिवणाच्या टेबलाच्या खणांत, उजव्या बाजूंच्या कोपऱ्यांत ठेवलेलीं आहेत. तीं एकंदर तीस पत्रं आहेत.' मी उठलों, त्या टेबलाचा खण उघडला आणि तें पत्रांचं पुडकं काढून तिच्यापुढं धरलं. तिनं तें जवळ जवळ माझ्या हातून हिसकून घेतलं. माझे आभार मानायचें भान देखील तिला राहिलं नाही. क्षणार्धांत ती तिथून निघून गेलीं.

"डॉक्टर–त्या क्षणापासून–ज्या ठिकाणीं–तिच्या मुखांतून रक्ताच्या चिळकांडी बरोबर उडालेला–तो रक्ताचा थेंब माझ्या उजव्या हातावर पडला होता तो हाताचा भाग एकसारखा जळजळूं लागला. हें जळजळणं विचित्र होतं. बेचैन करणारं होतं. या मर्मभेदी जळजळीचं दुःख पुढं पुढं इतकं वाढलं, कीं त्यामुळं हृदयविदारक यातना होऊं लागल्या. माझ्या संशयात्म्यानं, उतावळेपणानं केलेल्या अत्याचारांचं हें दंडण होतं. एका निरपराध, निरागस, अबोध, स्नेहशील पत्नीचा मी अविचारानं खून केला होता. हा अदृष्य घाव कुठल्याहि अफलातून धन्वंतऱ्याच्या हातून बरा होणारा नाहीं. मी तो बरा करूं इच्छितहि नाहीं. फक्त त्याची जळजळ वाढली कीं, असा एक धगधगीत पेटता निखारा त्यावर ठेवणार आहे. जीवनाच्या अंतापर्यंत......!" ●●

(पान ३१ वरून)

आतां प्रत्येकजण जेव्हां त्या गाढवाविषयीं बोले तेव्हां आपण आपलं कर्तव्य बजावल्याचा आनंददायी सूरच त्यांत मुख्य असे. तें गाढव गाढविणींच्या मागें धावत असे, त्या घटना जणुं गांवकरी साफ विसरल्यासारखे दिसत होते...कांहींची मजल तर आणखी पुढें गेली. आपल्या तबेल्यांत जेव्हां तें गाढव एकटं असे, अन् आपलं डोकं तें इकडून तिकडे आणि तिकडून इकडे हलवीत असे तेव्हां तें अल्लाचं नांव घेत असे, असल्या कथा ते एकमेकांना शपथेवर सांगूं लागले.

या प्रकाराचा वर्धापनदिन आला अन् भाताची विक्री करण्याकरतां राजधानीला गेलेला हसमन दिङ्मूढ होऊनच परत आला. बाजारांत माणूस माणसाला खेटून चाललं असतांना एकाएकीं त्याच्या कानावर आरडाओरडा आला, "जाऊं द्या, त्याला वाट द्या, त्याला हात लावूं नका!" लोक दुतर्फा पांगले अन् मधून न्यायमूर्ति निघून गेले. त्यांच्या अंगावर तो सुप्रसिद्ध नारिंगी अंगरखा होता, अन ते ज्याच्यावर बसले होते तें गाढव करड्या रंगाचं होतं! सबंध शरीर गदगद हलवून ते दोन्ही हातांनीं 'सलाम' स्वीकारीत होते, त्यावेळीं इकडून तिकडे आणि तिकडून इकडे मान हलवितांना तें करडं गाढव अल्लाचं नांव घेत होतं कीं नाहीं तें मात्र लोकांच्या गोंगाटामुळें हसमनला नीटसं ऐकूं आलेलं नव्हतं.— ●●●










# माझे नवे काका

*हल्लीच प्रसिद्ध होत असलेल्या 'दि एशिया मॅगेझिन' या साप्ताहिकांत प्रसिद्ध झालेल्या* **शू यो – सुप** *या नांवाच्या आपल्याकडे अपरिचित अशा एका लेखकानें अत्यंत हळुवार हातांनीं या कथेंतील नाजुक धागेदोरे कुशलतेनें गुंफले व इतकें परिपूर्ण चित्र निर्माण केलें कीं क्षणभर लेखक कोण, कोणत्या देशाचा हेंहि विसरून जावें — अशा या एका आगळ्या अनुभवाच्या या कथेचा श्री.* **दत्ता कदम** *यांनीं केलेला हा तेवढाच सरस अनुवाद.*

सहा वर्षांची मी एक लहानगी मुलगी आहे. ओक्ही माझं नांव. आमच्या कुटुंबांत आम्हीं फक्त दोघीच आहोंत, मी आणि माझी आई. हंऽ राहिलंच कीं, आणखी एकंजण आहे, माझे काका. ते हायस्कूलमध्यें शिकतात. घरीं ते कधींच रहात नाहींत. कुठंतरी सारखे भटकत असतात. केव्हां केव्हां तर आठवडेच्या आठवडे दिसत नाहींत. मग मी त्यांना विसरतेहि.

माझी आई देखणी आहे. अख्ख्या जगांत ती सर्वांत देखणी आहे. आतां ती चोवीस वर्षांची आहे. ती आहे विधवा.

माझ्या जन्माच्याआधीं महिनाभर माझे बाबा वारले असं माझ्या आजीनं मला सांगितलंय. आईशी लग्न केल्याला बाबांना तेव्हा उणंपुरं वर्षच झालं होतं. तिनं सांगितलंच कीं माझे बाबा इथं शिक्षक होते. त्यामुळं त्यांनीं आजीच्याच शेजारीं हें घर विकत घेतलं. बाबा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





देवाघरीं जाईपर्यंत ते आणि आई इथं एकत्र रहात होते. माझ्या बाबांना मी पाहिलेलं नाहीं. पण त्यांचं चित्र एकदां पाहिलंय. ते चांगले दिसत होते.

खरं सांगायचं म्हणजे आमच्या कुटुंबांत मी आणि आई अशा दोघींच आहोंत. पण घरांत जादा खोल्याहि होत्या आणि कसल्या ना कसल्या कामाच्या मदतीला आईला एखादा मुलगा हवा होता म्हणून काका घरांत आले.

या वसंत ऋतूंत मला बालमंदिरांत पाठवण्यांत येईल असं आईनं सांगितलं तेव्हां मी खूप झालें. जेव्हां मी घरीं परतलें तेव्हां माझे मोठे काका – म्हणजे आमच्याबरोबर रहाणाऱ्या काकांचे मोठे भाऊ–एका परक्या माणसाला घेऊन आले होते. बाहेरच्या खोलींत बोलत होते. काकांनी मला पाहिल्याबरोबर बोलावलं आणि त्या परक्या माणसाला मला नमस्कार करायला सांगितलं. मला लाज वाटली. मी पुतणी कीं काय असं त्यानं काकांना विचारलं. तेव्हां काकांनीं सांगितलं, 'हूं ती माझ्या बहिणीची मुलगी. क्योंगसन गेला आणि त्याचं हें मूल जन्माला आलं.'

त्यावर पाहुणा म्हणाला, 'इकडं ये ओक्ही. तुझे डोळे अगदीं तुझ्या बाबांच्यासारखे आहेत.'

'ये ग ओक्ही' काकाहि म्हणाले, 'तूं आतां तरुण बाई आहेस. इकडं ये आणि या सद्गृहस्थांना नमस्कार कर. हे तुझ्या बाबांचे मित्र आहेत... आणि ते या खोलींत रहायला येणार आहेत.'

तो माणूस इथं रहायला येणार आहे हें ऐकून मला आनंद झाला. त्या माणसासमोर मी गेलें. त्याला आदरानं मी नमस्कार केला आणि बागेकडे धूम ठोकली.

या नव्या काकांना आधीं कधीं मी ओळखत नव्हतें पण ते माझी फार दया करायचे. माझ्या बाबांचे ते चांगले मित्र होते असं गांवांतली वडीलधारी माणसं म्हणायची. त्यांनी दूरच्या ठिकाणीं कुठं अभ्यास केला होता. मला असं सांगण्यांत आलं कीं ते गांवांतल्या शाळेंत शिकवायला आले होते. गांवांत तर हॉटेल नव्हतं म्हणून कुणाच्यातरी सूचनेवरून ते आमच्या घरीं आले होते.

नव्या काकांच्याजवळ कितीतरी चित्रांची पुस्तकं होतीं. मी त्यांच्या खोलींत गेलें तेव्हां तर त्यांनी मला खांद्यावर उचलून घेतलं आणि चित्रं दाखवली. कधीं कधीं ते मला मिठाईसुद्धां देत असत. एके दिवशीं माझं जेवण झाल्यावर मी त्यांच्याकडं गेलें होतें. तेव्हां त्यांचं जेवण व्हायचं होतं. ते खात असतांना मी बघत राहिलें. भाताशिवाय आणखी काय काय मला आवडतं हें त्यांनीं मला विचारलं. मला अंडीं फार आवडतात असं मी सांगितलं. मग त्यांनी टेबलावरचं एक उकडलेले अंडं उचलून मला दिलं. मी घेतलं आणि खाऊन टाकलं. नंतर त्यांना काय फार आवडतं तें मी विचारलं. त्यांनी हंसून सांगितलं, 'मला सुद्धां अंडींच फार आवडतात.' तें ऐकून मला फार आनंद तर झालाच पण मी हें माझ्या आईला जाऊन सांगतें असं म्हणालें.

'नको हं नको' ते म्हणाले, पण मी जाऊन आईला सारं सांगितलंच.

एक आगळा कोरियन पत्रव्यवहार



# दुसरें कोरियन युद्ध असें टळलें!

जो स्मिथ नांवाचा एक कोरियन सैनिक होता. कोरियन युद्धाच्या वेळीं तो "प्रिन्स्टन" बोटीवर अधिकारी म्हणून काम पहात होता. युद्धकाळांत त्यानें नेत्रदीपक असा पराक्रम गाजविला. जगांतील प्रत्येक वर्तमानपत्रांत त्याचा फोटो प्रसिद्ध झाला. त्याच्या पराक्रमाच्या चित्रविचित्र हकीगती प्रसिद्ध झाल्या. थोडक्यांत म्हणजे त्याला अमाप प्रसिद्धि मिळाली. त्याचा अभूतपूर्व पराक्रम, त्याचा उदोउदो व फोटोतील त्याचा देखणा चेहरा, हे सर्व पाहून एक कोरियन ललना त्याच्यावर बेहद्द खुष झाली. [ ना ओळख, ना पाळख तरीहि तिनें स्मिथशीं 'लग्न' करण्याचें ठरविलें ] एके दिवशीं सकाळीं स्मिथ "प्रिन्स्टन" वर उभा असतांना त्याला एक पत्र मिळालें. त्या पत्राला मोहक सुगंधाचा वास येत होता. लगबगीनें स्मिथ तें पत्र वाचूं लागला--

**प्रिय जो स्मिथ,**

अनोळखी पुरुषांना पत्र लिहिण्याची मला संवय नाहीं. पण मी जेव्हां 'कोरियन हेराल्ड' मध्यें तुमचा फोटो पाहिला, तेव्हांच मी ठरवून टाकलं कीं बस, आपल्याला हवा तो पुरुष हाच आहे!

तेव्हां तुम्हांला पत्र लिहिण्यांत जर मी धिटाई दाखवीत असेन तर तुम्हीं मला मनापासून क्षमा करा.

पण 'हिरो' ठरलेल्या पुरुषाचा ध्यास घेणं वावगं आहे कां?

सध्यां "प्रिन्स्टन" कुठें आहे, हेंही मला माहिती नाही; म्हणून हें पत्र मी तुमच्या कोरियांतील घरच्या पत्त्यावर पाठवीत आहे. माझी खात्री आहे. तुमची म्हातारी आई तुम्हांला हे पत्र मिळण्याची व्यवस्था जरूर करील.

मी फक्त २० वर्षांची आहे. अर्थात् मी सुंदर आहेच माझे डोळे निळे आहेत. उंची पांच फूट दोन इंच आणि वजन ९० पौंड! मेरीलीन मन्रोची 'मापं' तुम्हांला माहिती आहेत ना? माझी अगदीं तीच आहेत! जराहि तफावत नाही. गेल्या वर्षी युनिव्हर्सिटीच्या मुलांनीं (मुलींनीं नाही हं!) त्यांची 'प्यारी विद्यार्थिनी' म्हणून मला प्रचंड बहुमताने निवडून दिली.

हं, हं, गैरसमज करून घेऊं नका. मला 'गृहिणी'पणाचा किती अभिमान आहे म्हणून सांगूं, आणि 'आदर्श गृहिणी' राहण्याचा मी कसोशीनं प्रयत्न करीत आहे.

मला स्वयंपाक बरा करता येतो. दारूपासून कोशिंबीर मी फार चांगली करते.

टेनिस व गोल्फ माझे अत्यंत आवडीचे खेळ. घोड्यावरून रपेट मारण्यांत मीं तरबेज आहे. ब्रिज खेळणे व मोटार चालविणे हे माझे प्यारे छंद. माझ्या जवळ एक 'कॅडिलॅक' आहे.

आतां थोडं तुमच्यासंबंधी विचारतें. तुम्हीं 'प्रिन्स्टन' वरून मोकळे झालांत कीं तुम्हांला नाचताना [illegible] अशी माझी फार इच्छा





आहे. तुम्हीं मला कळवाच. मी 'कॅडिलॅक' घेऊन येते. तुमची 'शोफर' होऊन, मी तुम्हांला खूप खूप हिंडवून आणीन. तुम्हीं म्हणाल तिकडे, फर्मान कराल त्या ठिकाणीं ! कुठेंही !!

प्रेमपूर्वक, तुमची एक चाहती,

**मेरी लाऊ**

ह्या पत्राखालीं दुसऱ्या एका हस्ताक्षरांत 'ताजा कलम' होता–

प्रिय जो स्मिथ,

मेरी लाऊचं पत्र माझ्या घरांत पोस्टमननं टाकलं आणि ते माझं नाहीं हें कळण्यापूर्वीच मी तें चुकून उघडलं. क्षमा करा मला !

पण किती विलक्षण योगायोग जुळून आला पहा ! मीहि वर्तमानपत्रांतून तुमच्याबद्दलची खूप हकीगत वाचली आहे. शिवाय तुमचे फोटो अनेक वेळां पाहिले आहेत. विश्वास ठेवा माझ्यावर, अगदीं खरं सांगतें. तुम्हीं केलेला पराक्रम वाचून प्रत्येक वेळीं माझं मन पुलकीत व्हायचं.

मी फक्त १९ वर्षांची आहे. किती कोवळं वय नाहीं. ? माझ्या डोक्याचा रंग लालबुंद आहे. आणि माझे डोळे बदामी आहेत. माझ्या सौंदर्याबद्दल भलतंच वर्णन करून, उगाच तुम्हांला फसवून मला काय करायचं आहे ? पण खरंच सांगतें. मी मेरीलीन मन्रो मुळींच नाहीं ! तरीहि माझे मित्र (मैत्रिणी नव्हे !) मला सुंदर म्हणतात व माझं व्यक्तिमत्व आकर्षक आहे म्हणें !

स्वयंपाक करण्याचा मला भारी कंटाळा येतो. पण मी 'आईस-क्रीम' छान करते हं.

खरं सांगतें, ब्रिज कसा खेळवा हें मला माहिती नाहीं.

मात्र मोटार चालवायला मला आवडतं. माझ्याकडे एक जुनी 'फोर्ड' पण आहे. परंतु कधींतरी मी नवी कोरी मोटार विकत घेईन असा मला आत्मविश्वास आहे.

मी 'ॲथलेट' मुळीच नाहीं. मी अजून कधींही गोल्फ खेळलेली नाहीं. टेनिस तर नाहीच नाहीं. तर मग घोड्यावरून रपेट मारणं सोडाच !

माझी 'मापं' हवी तशी 'उत्तान' नाहींत. माझं वजन मात्र १४० पौंड आहे, आणि हो, विसरलेंच !

मी सात महिन्याची गरोदर आहे !

पसंत आहे मी तुम्हांला ?

तुमची प्रिय पत्नी,

**हिल्दा**

दोन्ही पत्रं, वाचून जो बिलकुल पाघळला नाहीं. त्यानें उरलेल्या जागेत, सरळ पुढील मजकूर लिहिला––

'भगिनी मेरी लाऊस,

तुमच्या 'कॅडिलॅक'मधून खूप खूप हिंडायला मला फार आवडलं असतं, पण तुमच्या 'कॅडिलॅक' वर हिल्दा नांवाची १४० पौण्ड वजन असलेली कोणी एक स्त्री 'पहारा' ठेवून आहे. आपण 'लाईन क्रॉस' करून हिंडायचं आणि उगाच तिनें नंबर टिपून घ्यायचा आणि मग त्यांतून दुसरं कोरियन युद्ध निर्माण व्हायचं. पहिलं अजून संपायचंय, तेव्हां दुसरं मी टाळू इच्छितो. क्षमस्व !

– जो स्मिथ

तिन्ही पत्रें असलेला तो कागद मग जो नें एका पाकिटांत घातला व त्या पाकिटावर मेरी लाऊचा पत्ता काळजीपूर्वक लिहिला !

मूळ लेखक : कॅ. डब्ल्यू. ज. लेडरर.

अनुवाद : दि. श्री. कराडकर ●●●

वरं केलं मी. कारण तेव्हांपासून माझ्या आईनं केव्हांहिपेक्षां अधिक अंडीं आणायला सुरवात केली.

मी बालमंदिरांत जाऊं लागले. तिथं मी गायला, नाचायला, खेळायला शिकलें. माझे गुरुजी ऑर्गन फार छान वाजवीत. चर्चमधल्यापेक्षां बालमंदिरांतला ऑर्गन लहान होता पण तो वाजायचा चांगला. असंच एकदां बालमंदिरांतल्या ऑर्गनसारखं कांहीं दिसणारं वरच्या खोलींत माझ्या दृष्टीस पडलं. म्हणून एकदां मी घरी आल्यावर आईला त्याबद्दल विचारलं. आईनं तो ऑर्गन असल्याचं सांगितलं.

पण तो वाजवतांना तिला मी कधी पाहिलं नव्हतं. म्हणून मी विचारलं, 'तुला ऑर्गन वाजवतां येतो ?' तरी आईनं लगेच उत्तर दिलं नाही. ती जरा त्रासलेली दिसली. मग ती म्हणाली, 'तुझ्या बाबांनीं हा ऑर्गन माझ्यासाठीं आणला होता. तो मी नेहमी वाजवायची. पण ते गेल्यापासून मी त्याला शिवलेली नाही.' ती अगदी रडण्याच्या बेतांत होती. म्हणून मी मिठाई मागितली आणि आम्हीं आंतल्या खोलींत आलों.

बाहेरच्या खोलींत जाऊन नव्या काकांशीं बोलत रहावंसं मला फार वाटायचं. पण त्यांना फार त्रास देवूं नको असं आईनं सांगितलं होतं. खरं म्हणजे मी त्यांना कधींच त्रास दिला नाहीं. उलट त्यांनीच मला त्रास दिला. आमच्याकडं आल्यावर महिनाभरानं त्यांनीच माझ्याशीं अशा प्रकारानं बोलायला सुरुवात केली, 'तुझे डोळे तुझ्या बाबांच्यासारखे आहेत पण हें देखणं नाक तुला तुझ्या आईकडूनच मिळालेलं आहे. आणि हे ओटमुद्रां. तुला नाही वाटत ? तुझी आई तुझ्यासारखीच देखणी आहे ?'

म्हणून मी त्यांना म्हणाले, 'अजून तुम्हीं माझ्या आईला पाहिलेलं नाहीं ?' ते कांहीं बोलले नाहीत तेव्हां मीच पुन्हां म्हणालें, 'आंत चला, माझ्या आईला बघूं.' आणि मी त्यांची बाही ओढली. ते म्हणाले, 'नको नको, मला आत्तां काम आहे.' तें कांहीं कामांत नव्हते नाहीतर त्यांनी मला घालवून द्यायला हवं होतं म्हणजे त्यांना कांहीं करतां आलं असतं. पण माझ्याशीं बोलणं त्यांनी चालूच ठेवलं आणि माझ्या हनुवटीचा मुका घेऊन म्हणाले, 'हा कोट कुणी शिवला ?......तुझ्या आई बरोबरच तूं तिच्या बिछान्यांत झोंपतेस......'

या बाबतींत एक गोष्ट मात्र गमतीशीर होती. नेहमी ते माझी दया करायचे, कुरवाळायचे, पण ते धाकटे काका आजूबाजूला असले कीं त्यांचा नूर बदलायचा. मग दया नसायची, मुके नसायचे, प्रश्न नसायचे.

एका शनिवारच्या संध्याकाळीं गांवामागे असलेल्या टेकडीकडे त्यांच्याबरोबर चलायला काकांनीं मला विचारलं. या विचारण्याचं मला फार सुख वाटलं आणि मी लगेच होय म्हटलं. पण ते म्हणाले, 'आंत जाऊन आधीं आईची परवानगी काढ.' आईनंसुद्धां रुकार दिला. माझं तोंड धुतलं, केस विंचरले आणि मला कुरवाळून मोठ्यानं म्हणाली, 'बाहेर फार उशीरसर राहूं नको.' मला वाटतं काकांनीं-मुद्दां ते ऐकलं.






आम्हीं टेकडी चढलों. तिथून सारा गांव दिसत होता. काका गवतावर पडले. आनंदानं मी कितीतरी बागडले, खेळले आणि गवताच्या पात्यांनीं काकांना गुदगुल्याहि केल्या. खालीं परततांना त्यांनीं माझा हात धरला होता. वाटेंत भेटलेल्या बालमंदिरांतल्या सोबत्यांपैकीं कुणी म्हणाला, 'आँ! ती तिच्या बाबांच्याबरोबर चालतेय.' मला लाज वाटली. मलाहि वाटलं, माझे काका माझे बाबाच आहेत. आम्हीं आमच्या फाटकापाशीं आलों तेव्हां मी चटकन म्हणाले, 'मला वाटलं तुम्हीं माझे बाबाच होतां.' त्याबरोबर त्यांचा चेहरा गाजरासारखा लाल झाला. मला गदगदां हलवून ते म्हणाले, 'असं कांहीं तूं बोलूं नको,' घाबरून मी माझ्या खोलीकडे पळालें.

आईनं जेव्हां मला विचारलं, 'किती दूर गेली होतीस ?' तेव्हां मला उत्तर देतां आलं नाहीं. मला हुंदकून आलं.

दुसरा दिवस रविवार होता. कपडे करून मी चर्चला जाण्यासाठीं तयार झाले. आईनं कपडे करण्याची मी वाट पहात होते. तेव्हां मी जरा दूर सरकले आणि माझाच विचार काका करतायत काय हें बघण्यासाठीं काकांच्या खोलींत मी डोकावले. टेबलाशी ते कांहीं लिहीत होते. मला बघून ते हंसले. मला जरा हायसं वाटलं. त्यांना हंसतांना बघून मला समाधान वाटलं. काळजीपूर्वक त्यांनी माझ्याकडे पाहिलं आणि म्हणाले, 'वा! किती मोहक आहेस तूं, कुठं जातेयस ?

'आई बरोबर चर्चला.'

'चर्च ?...कोणतं चर्च ?'

'हें इथलं जवळचंच.'

माझ्या आईनं मला साद घातली म्हणून मला जावं लागलं.

चर्चमध्यें गाण्यानंतर प्रार्थना होती. सगळ्या लोकांनी माथीं नमविल्यावर काकांची मला आठवण झाली आणि ते चर्चमध्यें असतील काय असं मला नवल वाटलं. मी माझं डोक वर करून सभोंवतीं पाहिलं तर खरंच ते पुरुषांच्या जागेंत दिसले. पण गंमत अशी कीं इतरांच्या प्रमाणं ते माथं नमवित नव्हते. ते भोंवतालीं बघत होते. त्यांच्याकडे बघून मी हंसले पण ते कांहीं हंसले नाहींत. मला वाटलं त्यांनी मला पाहिलं नसावं म्हणून मी हात वर करून हलवला. मला पाहिल्याबरोबर लगेच त्यांनी डोकं खालीं केलं. त्याचवेळीं मी प्रार्थना करीत नाहीं हें आईच्या लक्षांत येतांच तिनं मला खालीं वाकवलं. तिच्या कानांत मी गुणगुणले, 'ते काका इथंच आहेत.' आईचा चेहरा लाल झाला. त्या सकाळीं प्रार्थना भयानक वाटली. प्रार्थनासंपेतोंवर माझ्याकडे बघून आई हंसली नाहीच पण रागांत असल्यासारखं तिनं उपदेश होत होता त्या जागेकडे रोखून पाहिलं जेव्हां मी काकांच्याकडे पाहिलं तेव्हां ते हंसत तर नव्हतेच पण माझ्याकडे त्यांनीं पाहिलंच नाहीं असं भासवित होते. जेव्हां जेव्हां मी पुरुषांच्या जागेकडे बघे तेव्हां तेव्हां माझी आई उपदेश चालला होता तिकडे खेंचून बघायला लावीत होती. मी मूर्खच बनलें होतें आणि रडण्याच्याच बेतांत होते. जवळच मी बालमंदिरांतल्या शिक्षकांना पाहिलं त्यामुळं मी रडूंहि शकलें नाहीं.

बालमंदिरांत मी जाऊं लागलें तेव्हां पहिल्यापहिल्यानं धाकटे काका मला पोंचवायचे, शाळेंतून न्यायचे. पण नंतर मी स्वतःच जाऊं येऊं लागलें. मी घरीं आलें कीं माझी आई बाजूच्या फाटकांत माझी वाट बघत असायची आणि मला हातांवर उचलून घेऊन घरांत जायची.

पण एके दिवशीं बालमंदिरांतून मी परतल्यावर माझ्या स्वागतासाठीं ती फाटकापाशीं नव्हती. बहुतेक करून पुढच्या बाजूला असलेल्या आजीच्या घरीं ती गेली होती. पण मला एकाकी आणि खिन्न वाटलं. तिला घाबरवून सोडायचं मी ठरवलं. पण कांहीं करण्यापूर्वीच घराबाहेरून आलेला तिचा आवाज मी ऐकला, 'माझी लाडकी घरीं आली ?' झटकन मी माझे जोडे काढले आणि ते घेऊनच आंतल्या खोलीकडं धावले. नंतर मी फडताळ उघडलं आणि जोडे घेऊनच आंत लपले. 'ओव्हडी, तूं इथं आहेस ?' आणि पुढं मी ऐकलं, 'अं नाहीं ती इथं.' नंतर ती माझी वाट पहायला बाहेर गेलेली ऐकलं. मला मजा वाटली. मीं माझ्याशींच हंसले. मग थोड्या वेळानं मी आईचा संताप ऐकला, गडबड ऐकली. आधीं आईचा आवाज आणि मग धाकट्या काकांचा.

नंतर मला आईचे हुंदके ऐकूं आले. तेव्हां मला वाटलं आपण बाहेर यावं. पण मग ठरवलं कीं आईला अजून पुरेशी शिक्षा झालेली नाहीं. मी तिथेंच पडून राहिले. आंत कसं गरम आणि कोंदट होतं. मला वाटतं मला झोंप लागली. किती वेळ मी झोंपले हें मला ठाऊक नाही पण मी उठले तेव्हां घाबरलेंच. कारण पार काळोख झाला होता. मला रडूं कोसळलं. तेव्हां मी आईचा नवलानं भरलेला आवाज ऐकला आणि मग फडताळाचं दार उघडून तिनं मला बाहेर खेंचलं. पहिल्यानं तिनं मला थप्पड मारली तशी मी अधिक रडायला लागलें. नंतर तिनं मला हृदयाशीं घट्ट धरलं आणि हुंदकूं लागली...' ओव्हडी, माझ्या सोनुल्या, तुला कसला धक्का लागलेला नाहीं ना ? तुझी आई इथंय. रडूं नको हं सांग ना तूं बरी








आहेस ना. जोंवर तूं माझ्याबरोबर आहेस तोंवर सगळं ठीक आहे. तेवढंच सारं मला हवंय. मला दुसरं कुणी कुणी नको. '

दुसऱ्या दिवशीं बालमंदिरांतून मी परत येत होतें. आदल्या दिवशीं मी काय केलं तें आठवलं आणि आईबद्दल मला वाईट वाटलं. माझ्या मनांत आज तिला आनंदी करायचं होतं. फुलदाणींतली फुलं आठवेपर्यंत काय करावं हेंच सुचत नव्हतं. बालमंदिराच्या खोली-कडे मी परत गेलें पण तिथं कुणीच नव्हतं, अगदीं शिक्षकसुद्धां नव्हते. मी दोन फुलं घेतलीं आणि घराची वाट धरली. मला ये म्हणत जवळ घेऊन आई म्हणाली, ' किती सुंदर फुलं आहेत. कुठं मिळाली तुला ? काय सांगावं तें मला कांहीं कळलं नाहीं. खरं सांगायला मी भ्याले आणि मी जे बोलून गेले त्याबद्दल मला नवल वाटलं. मी म्हणाले,... 'त्या खोलींतल्या नव्या काकांनी मला...ही...तुला द्यायला सांगितलंय.'

माझ्या आईला धक्का बसल्यासारखं वाटलं आणि ती मुक्यासारखी उभी राहिली. तिचा चेहरा फुलासारखा लाल लाल झाला आणि ती कापऱ्या आवाजांत म्हणाली. ' तूं...तूं अशी कांहीं वस्तू घेऊं नको. इतका तिचा कल्लोळ कां झाला याचं मला नवल वाटलं, कसंहि असो पण माझा खोटेपणा यशस्वी झाला आणि माझ्यावर न रागावतां ती त्यांच्यावर रागावली यामुळं मला समाधान वाटलं. थोड्या वेळानं ती म्हणाली, ' सोन्या, कुणालाहि या फुलांच्याबद्दल कांहीं सांगू नको. सांगशील ?' मला वाटलं होतं कीं ती फुलं फेकून देईल पण तिनं ती फुलदाणींत ठेवलीं आणि फुलदाणी ऑर्गनवर मांडली. अगदीं अखेरची पाकळी गळेपर्यंत तिनं ती तिथं ठेवली. नंतर शेंडे कापून स्तोत्राच्या पुस्तकांत ठेवली.

त्या संध्याकाळी मी नव्या काकांना पहायला गेले आणि त्यांच्या मांडीवर बसून मी चित्रांचं पुस्तक बघत असतां त्यांची एका आवाजानं चलबिचल झाली. तो आवाज ऑर्गनचा होता आणि तो आंतल्या खोलींतून येत होता. मला आईच वाजवतेयसं वाटलं म्हणून मी बघायला धांवले.

दिवा लावलेला नव्हता पण टिपूर चांदण्यांत शुभ्र पांढरा पोषाख करून आई ऑर्गन वाजवीत होती. बालमंदिरांतल्या शिक्षकांच्यापेक्षां ती चांगलं वाजवीत होती. तिच्याजवळ मी गेलें पण माझी दखल न घेतां ती वाजवीतच राहिली. लगेच तिनं गायलाहि सुरुवात केली. एवढा तिचा आवाज गोड होता याची मला कल्पनाच नव्हती.

एका रात्रीं काकांच्या खोलींतून मी परतत होते तेव्हां त्यांनी माझ्यापाशीं एक पाकीट दिलं. त्यांत कांहींतरी होतं. तें आईला द्यायला सांगून ते म्हणाले, ' गेल्या महिन्याच्या जेवण्या-राहण्याचे हे पैसे आहेत आईला जेव्हां मी तें दिलं तेव्हां ती पांढरी फिक्कट पडली. मी म्हणाले, ' ते म्हणाले कीं हे जेवण्या-राहण्याचे पैसे आहेत. या शब्दांनीं ती भानावर आली. मग ती एकदम लाजली. तिनं पाकीट घेतलं आणि त्यांतून कांहीं बाहेर काढलं त्या नोटा होत्या. तिनं सुटकेचा मोठा निःश्वास टाकला. तरी तिला नवल वाटलेलं दिसलं. तिनं पाकिटांत चोरून बघितलं आणि घडी केलेला पांढरा कागद बाहेर काढला. उलगडूं कां नको असं तिला वाटलं पण तिनं कागद उलगडलाच. त्यावर काय लिहिलेलं होतं तें मला माहीत नाही पण तिचे हात कांपत होते, तिच्या चेहऱ्यावर लाली चढली. नंतर तिनं त्याची घडी केली.

मग पैसे आणि तें पत्र पाकिटांत ठेवलं आणि तिनं तें पाकीट शिवणाच्या टोपलींत ठेवलं. नंतर ती निमूट खालीं बसली. पण तिचे श्वास जोरानं चालले होते. मला वाटलं ती आजारी पडणार. म्हणून मी म्हणाले, ' आई ग, आपण झोंपूं चल ' तिनं हूं केलं आणि माझा मुका घेतला.

थोड्या वेळानं मी जागी होऊन नेहमीप्रमाणें आईला चाचपलं तर ती तिथं नव्हती. मला भीति वाटली. तिला शोधण्यासाठीं मी डोकं वर केलं. खिडकींतून येणाऱ्या चांदण्यानं खोली कशी उजळून निघाली होती. खोलीच्या दुसऱ्या कोपऱ्यांत बाबांचे कपडे ठेवलेली मोठी पेटी होती. तिथं पायजमा घालून आई बसलेली होती. पांढरे कपडे तिनं बाहेर काढले आणि जमिनीवर पसरले. डोळे झाकून स्वतःशीं कांहीं पुटपुटत पेटी पुढं तिनं डोकं नमवलं. मला वाटलं ती प्रार्थना करतेय. तिच्याजवळ जाऊन मी तिच्या मांडीवर बसले आणि म्हणाले, 'आई ग, तूं काय करतेयस ?' ती पुटपुटायची थांबली. तिनं डोळे उघडले. बराच वेळ टक लावून माझ्याकडे पाहिलं आणि हळुवारपणं म्हणाली, ' ओब्ही, माझ्या सोन्या. '

' काय आई ? '

' चल आपण पुन्हां झोंपूं '

' तूं सुद्धां झोंपशील ? '

' हूं, मी सुद्धां. '

तिचा आवाज मला दुःखी वाटला.

त्या दिवसांत आईचं कांहीं कळणंच कठीण होतं. ती कांहीं तरीच गोष्टी करायची. एखाद्या सायंकाळीं ऑर्गन वाजवायची तर एखादे वेळीं गायचीसुद्धां. मग मला बरं वाटायचं आणि मी ऐकत रहायची. पण बऱ्याच वेळां तिच्या गाण्याचे शेवटीं हुंदके व्हायचे.

उन्हाळ्यासाठीं बालमंदीर बंद झाल्यानंतरच्या एका रविवारीं डोके दुखीचं कारण सांगून माझी आई चर्चला गेली नाहीं. घरांत आम्हीं दोघी जणींच होतों. मला बोलावून घेऊन ती म्हणाली, ' लाडके, तुझ्या बाबांना तुला बघायचंय ?'

' होय, बाबा हवेत मला ' मी म्हणाले.

कांहीं वेळ तिनं चकार शब्द काढला नाहीं. आणि मग हळूहळू म्हणाली, ' सोन्या, तुझे बाबा तूं जन्मायच्या आधींच गेले. तुला बाबा होते....ते आतां इथं नाहींत...पण तुला नवीन बाबा मिळणार नाहींत आणि जर तसं झालं तर आजूबाजूचे लोक तुला–मला दूषण देतील. जगाची तुला जाणीव नाहीं. पण हे लोक तुझ्यावर तळतळाट करतील आणि तुझ्या मैत्रिणी तुझ्याकडे बघून हंसतील...मग तूं कुठल्या चांगल्या तरुणाशीं लग्न करूं शकणार नाहींस आणि तूं चांगली विद्यार्थिनी असूनसुद्धां तुझी कीर्ती होणार नाहीं. असं काहीसं ती स्वतःशीं म्हणाली आणि मग तें मला ऐकवलं.

'ओब्ही, तूं मला सोडूं नको हं. तूं तुझ्या आईबरोबरच रहा... अगदी म्हातारी मी झालें तरी रहा...अगदीं तुझं बालमंदिर संपलं तरी...प्राथमिक शाळा झाली तरी...हायस्कूल झालं तरी...अगदीं कॉलेज संपलं तरीसुद्धां तूं माझ्याबरोबर रहा. ओब्ही, माझ्यावर तूं कितीसं ग प्रेम करतेस सांगशील?'

मी माझे हात पसरून सांगितलं, ' इतकं.'

' कळलं कळलं चांगलंच. आणि तूं फक्त आईवरच प्रेम कर. नाहीं ? तूं शाळेला जाऊन अभ्यास करशील आणि चांगली स्त्री

[ पान ४६ वर ]












तारेवरची कसरत

## चकवा

लेखकः—उमाकांत ठोमरे

'चकवा' हा श्री. ठोमरे यांचा चार अनुवादित कथांचा संग्रह. पैकी पहिली कथा तिची दैनंदिनी ही 'दि डायरी ऑफ ॲन फ्रॅन्क' या चित्रपटाची कहाणी–दुसऱ्या महायुद्धांत जर्मनांनी ज्यूंचा छळ केला त्यासंबंधीची प्रत्यक्ष दुःख भोगलेल्या एका निष्पाप, असहाय्य पण तेजस्वी अशा मुलीची ही दैनंदिनी ही कथा वाचली आणि त्याच त्याच त्रिकोणाबाहेर किती जग आहे याची जाणीव झाली. कथा वाचून संपवली आणि कांहीं वेळ मन सुन्न झाले.

दुसरी कथा 'पंख' ही 'द स्पिरिट ऑफ सेंट लुई' या चित्रपटकथेचा अनुवाद ध्येयनिष्ट, निष्कांचन तरुणाच्या साहसाची ही कथा. न्यूयॉर्कहून पॅरिसला, मधें न थांबतां विमानोड्डाण करणं या लोभानें प्रेरित झालेल्या लिंडबर्गनें आपलं इप्सीत कसं साध्य केलं ते या कथेत निवेदन केलं आहे. प्रेमाचा लवलेश नसताहि कथा अथपासून इतिपर्यंत कशी वाचनीय होऊं शकते तें ही कथा वाचतां कळतं.

तिसरी कथा 'झपाटलेली' ही 'वूमन आबसेस्ड' या चित्रपट कथेचा अनुवाद. या संग्रहांतील अत्यंत सरस कथा असं हिचं वर्णन करतां येईल. लेकुरवाळी विधवा व एक विधुर यांच्या संघर्षाची–गैरसमजाची, प्रीतीची कर्तव्याची, पौरुषाची ही समर्थ कथा.

चवथी व शेवटची कथा 'चकवा' हा कथांचा अनुवाद आहे याचा उल्लेख केलेला नाहीं. चारी कथांपैकीं डावी कथेमधें इतकीं पात्रं येतात कीं शेवटी त्यांतील पुष्कळशा व्यक्ति एकमेकांत मिसळतात व चित्रण अस्पष्ट होतं व त्यांमुळेंच कथा परिणामकारक वाटत नाहीं.

श्री. ठोमरे यांनीं पहिल्या तिन्ही कथांचे लेखन अतिशय सुंदर केलं आहे. एखादी कथा लिहावयास जेवढे श्रम पडतात तेवढेच किंबहुना काकणभर जास्त चांगल्या कथेचा सुंदर अनुवाद करावयास श्रम पडतात. आणि तरीही अनुवादकावर लेखक व टीकाकार 'ठीक आहे–अनुवाद', 'अनुवाद मुळाबरहुकूम नाहीं', 'अनुवाद करतांना मूळ लेखकावर अन्याय झाला—" वगैरे वगैरे आरोप करतात. हे आरोप नेहमींच खोटे असतात असें नाहीं. पण अनुवादकाला तारेवरची कसरत करावी लागते त्याची जाणीव फारच थोड्यांना असते.

इतका जाच असूनही श्री. ठोमरे यांनीं सरस आणि सुरस अनुवाद सादर केले आहेत. पूर्वी शान्ताबाई शेळके यांनीं असें लेखन केलें होतं. या तऱ्हेचे आणखी लेखन श्री. ठोमरे यांनीं करावें ही सूचना

—श्रीकृष्ण ठाकूर

[प्रकाः—श्रीराम प्रकाशन, ठाकुद्वार मुंबई–२ मुल्यः—३ रुपये ] ० ० ०

'रंगतदार' पुस्तक

## पहिलें शतक

लेखक —बाळ ज. पंडित

प्राजक्ताच्या फुलांचा सडा पडला कीं कुठलं फुल वेचूं आणि कुठलं नको असं होऊन जातं. क्रिकेट–शौकिनांच्या हातांत श्री. बाळ पंडित ह्यांचे 'पहिलें शतक' हे पुस्तक पडलं कीं त्यांचीही अशीच अवस्था होण्याचा संभव आहे—कुठलं प्रकरण वाचूं आणि कुठलं नको. कारण ह्या पुस्तकांतील प्रत्येक प्रकरणाला एक आगळी गोडी प्राप्त झाली आहे. जुन्या सुखद स्मृतींना उजाळा देतांना मनाला जो एक विलक्षण आनंद होतो तोच आनंद क्रिकेटमधील ह्या जुन्या आठवणी वाचतांना होतो. लेखकानें 'पहिलें शतक' ह्या प्रकरणांत फारच खुमारी निर्माण केली आहे. 'सलामी', 'डावांची रंगत आणि संगत', 'डाव थांबविला आणि !' ह्या प्रकरणानांही स्वतःची ऐट आहे. 'असे खेळाडू, असे सामने, अशी रंगत' ह्या प्रकरणांतील जुन्या नाणावलेल्या खेळाडूंची 'बहादुरी' वाचतांना हे खरे खेळांतले राजे !' हें पटतं. परंतु एक खटकतं, ते हें कीं हजारेबद्दल फारच थोडी माहिती लेखकानें दिली आहे. वास्तविक पाहतां हजारेबद्दल रसभरीत माहिती देणें सहज शक्य झालं असतं. 'क्रिकेटमधील कांहीतरी आगळं' ह्या लेखांत लेखकानें, 'लेखकांनीं फलंदाजी, गोलंदाजी, क्षेत्ररक्षण याबद्दल कांहीं शिकवलं नाही तरी चालेल पण क्रिकेटमध्यें हे जे कांहीं 'आगळं' असतं ते त्यांनीं शिकवलं पाहिजे. तेवढं आलं तरीसुद्धां आजकालचा खेळाडू हा 'क्रिकेटर' होत असतो, अशी जी शेवटी सूचना केली आहे ती मल्या मल्या टीकाकारांनीं व विशेषतः रेडिओ वरील 'कॉमेन्टेटर्स' नीं लक्षांत ठेवण्यासारखी आहे. प्रकरण रंगविण्याची हातोटी जर पंडितांना साधली तर त्यांचं 'क्रिकेट' वरील लिखाण आहे त्यापेक्षांही जास्त रंगतदार होईल. Hew's that ? असं जर कोणी ह्या पुस्तकासंबंधीं विचारलं तर मात्र बेलाशक सांगायला हरकत नाही, Interesting, Sir.

क्रिकेटवर मराठींत पुस्तक काढण्यचं धाडस कुठलाही प्रकाशक भीतिपोटी करीत नाही. पण अशी 'रंगतदार' पुस्तकं निघाली तर मराठी वाचक नक्कीच त्याचं स्वागत करील. ह्या दृष्टीनें प्रकाशक श्री. गाडगीळ हे त्याच्या ह्या धाडसाबद्दल अभिनंदनास पात्र आहेत

—दि. श्री. कराडकर

[डायमंड प्रकाशन, सांगली. पृष्ठें १०० किं. रु. २-५०. पै.]



अनुक्रमणिका

तलम-कथा

## चाहूल

--अरविंद गोखले

'चाहूल' हा गोखल्यांचा नाहीं म्हटलं तरी तेरा-चौदावा संग्रह असेल. त्यांचे दोनचार संग्रह तर गेल्या एकदोन वर्षांतच प्रसिद्ध झाले असावेत. एवढ्या विपुल कथालेखनानंतर विविधतेचा गुण टिकवून धरणं जरा अवघडच. तसं पाह्यलं तर गोखल्यांच्या कथा मुळांतच तलम. हा तलम मुलायमपणा त्यांच्या 'चाहूल' मध्येंहि आहेच. पण या सर्वांत एक गोष्ट खटकूं लागली आहे. पूर्वीची त्यांची हळुवार तरीहि सूक्ष्मदर्शी लेखणी कुठेंतरी निबरट झाली आहे, जून झाली आहे. एकाद्या रूपगर्वितेनं आपल्या सौंदर्याचा पूर्णोत्सव संपूंच नये म्हणून कसोशीनें मेहनत करावी आणि कुठें-तरी एकादी उणीव खटकावीच तसं हल्लीं गोखल्यांबद्दल वाटूं लागलंय. कुठेंकुठें तीच ती कथा, तींच तीं वळणं घेत आहे, त्याच त्या चाकोरीला वाट पुसत आहे, असा भास होत राहतो. मात्र तरीहि अद्याप आजच्या कैक नव्या दमाच्या लेखकांना सहजीं मार्गे सारील असं रूप गोखल्यांच्या कथेला आहेच. तें तर तिचं जन्मजात लेणं.

'चाहूल' मधली 'कॅक्टस्' तर १९६० च्या उत्कृष्ट कथांतली एक. खुद्द गोखल्यांच्याच अनेक प्रथम दर्जाच्या कथांतहि तिचा क्रम वरचा लागेल. पितापुत्रांच्या आयुष्यांत घडूं पाहणारी एक दोघांच्याहि जीवनाला असे कांहीं हेलकावे देते, असे छेद देते कीं घडणाऱ्या गुंत्यांत अडकलेलं मन कथेंतल्या आनंदरावां-सारखंच पिळवटतं, आक्रोशतं.

'चाहुल' मधल्या बाकीच्या जवळ जवळ सर्वंच कथांतून एक साम्य आढळतं. या बहु-तेक कथा मनावरचा असाह्य ताण सुटल्यामुळें होणाऱ्या विकृत प्रतिक्रिया चितारणाऱ्या आहेत. 'सवाष्ण' मधली रोहिणी, 'अन्नपूर्णा-तील अन्नपूर्णा,' मायलेकी 'तल्या बाबलीबाई आणि त्रिवेणी, 'गुंगी' तली निर्मला, 'दोघी'-मधली माई माईणकर साऱ्यावर पडलेला कुठला ना कुठला तरी ताण अनपेक्षितपणें नको इतका सुटला आहे आणि मग ही त्या ताणाच्याच आधारानें जगणारीं माणसं आतां अगदींच बावरलीं आहेत; दिशाभ्रांत झालीं आहेत. विकृतीच्या सुसाट झोतात हीं सारींच भरकटत गरागरा फिरत आहेत. आपल्या बरोबर इतरांच्याहि आयुष्यांत भणभणत आहेत. 'सोहनची आई' आणि 'प्रतिक्षे'त सुद्धां थोड्या फार फरकानं हें जाणवतंच. मी मघां म्हटलेला तोच तोपणा अशावेळीं वऱ्याचदां जाणवतो. (आणि त्यांचं एकत्रित गुंथनहि त्याला कारणीभूत आहेच!) मात्र या सर्वंच कथा सराईत, तयार हातानीं घड-लेल्या आहेत हें निर्विवाद!

'चाहुल' मधल्या कोंवळ्या, अस्पष्ट हुरहुरीपासून 'तिसरा भाऊ' मधाल विचित्र धुमाऱ्यांनीं झपाटलेल्या झाडासारख्या, बच्चूच्या मनाच्या शून्य निर्वात अवस्थेपर्यंत भावनांच्या आणि मनाच्या वेगवेगळ्या अवस्था गोखल्यांनीं उलगडल्या आहेत.

या सगळ्यांतून 'गोखले' खास उठून यावेत इतक्या त्या 'खास त्यांच्या' आहेत. 'अप्पी लाटकर' मध्यें अप्पी खुद्द कथेंत नाहींच. तरीहि तिच्याच भोंवतीं ही कथा विणली जाते. तिचाच मध्यबिंदू कल्पून कथें-तील पात्रें स्वतःचा आंस रेखतात; त्यांना पड-णाऱ्या परस्पर छेदांतून मानवी मनाचें विविध कोन दर्शन घडवतात.

'चाहूल' थोडक्यांत अशी आहे, गोख-ल्यांच्या साऱ्या गुणानीं नटलेली. 'तोच तो पणा'चा किंचित् डाग लागलेली पण समृद्ध अशी!

--पुष्पा त्रिलोकेकर

---

(पान ४८ वरून)

बनशील...तरीसुद्धां तूं आईवरच प्रेम कर हं.'

'होय ग आई मी तुझ्यावर इतकं प्रेम करते,' आणि मी माझे हात चौफेर पसरले.

'खरंच ग. मला दुसरं कुण्णी कुण्णी नको. दुसरीं सगळीं नालायक आहेत.' तिनं मला घट्ट मिठी मारली.

त्या संध्याकाळीं तिनं मला जवळ बोलावून माझे केंस विंचरले. मला नवे नवे कपडे घातले. मला कुठं पाठवतेस असं मी विचारलं तेव्हां ती हंसून म्हणाली, 'नाही ग तूं कुठं जात नाहीस.' मग तिनं ऑर्गनवरचा घडी केलेला रुमाल घेतला आणि माझ्या हातांत देऊन म्हणाली, 'हा......... हा नव्या काकांचा रुमाल आहे. त्यांना नेऊन दे आणि तशीच परत मागे ये.'

मी तो घेतला तेव्हां मला वाटलं आंत घडी केलेला एखादा कागद असावा. नव्या काकांना मी तो नेऊन दिला. पण त्यांची माझ्याबद्दलची वागणूक नेहमीपेक्षां अगदीं वेगळी वाटली. ते हंसलेहि नाहीत.

नंतर एका दुपारीं मी नव्या काकांच्या खोलींत गेलें. ते त्याचं सामान बांधीत होत. हात रुमाल त्यांना दिल्यापासून ते पार बदलून गेले होते, अगदीं खिन्न आणि दुःखी झाले होते. ते माझ्याशीं बोलतांहि नव्हते. माझ्याकडे रोखून बघत. म्हणून मलापण त्यांच्याबद्दल आवड राहिली नाही. त्यांच्याकडे वरचेवर जायची मी बंद झाले. पण आत्तां ते सामान बांधीत होते म्हणून मला नवल वाटलं. मी आईकडं पळाले.

'आई...आई ग...काका कां जातायत?'

'शाळा बंद झाली म्हणून?'

'कुठं ग जातायत'

'स्वतःच्या घरीं'

'ते परत येतील?'

ती कांहीं बोलली नाहीं.

काका निघून गेल्याच्या संध्याकाळीं, त्यांनी दिलेली बाहुली घेऊन मी खेळत होतें. तेव्हां सैंपाकघरांतून आई आली व म्हणाली, आपण टेकडीवर जाऊंया कां ग?'

'चल चल, मला फार आवडतं जायला'

हातांत हात घालून आम्हीं दोघीजणी टेकटीच्या माथ्याशीं गेलों. डोंगराच्या टोकाकडून शिटी मारीत आगगाडी स्टेशनकडे येत होती. क्षणभर मी थांबले आणि पुन्हां चालूं लागलें.

टेकडीवरून घरीं परतल्यावर खोलींत जाऊन आईनं आधीं ऑर्गन झांकुन ठेवला, त्याला कुलूप लावलं. इतके दिवस तो उघडाच होता. शिवणाची टोपली तिनं त्यावर ठेवली. मग तिनं स्तोत्राचं पुस्तक उघडलं. आंतली चिमटलेली फुलं काढून ती म्हणाली, 'दे फेकून' बाजूचं फाटक उघडून. अंडीविक्या आला तर... थंड निर्जीव स्वरात आईनं सांगितलं, 'आम्हांला अंडी नकोयत. अंड्याची आवड असलेलं आतां इथं कुणी नाही' माझ्यासाठीं कांहीं अंडी घ्यायला मी आईला सांगणार होते पण तिचा पार फिक्कटपणा बघून मला बळंच उरलं नाहीं. म्हणून मी माझ्या बाहुलीशींच बडबडूं लागलें, 'आई खोटं बोलली... मला अंडी आवडतात हें तिला माहित आहे. पण आई आजारी आहेस वाटतं... ती फारच फिक्कट दिसतेय... तिला मी आतां कांहींहि करायला सांगणार नाही.'

●●●







संघर्ष कथा

## अळवावरचें पाणी

ले. अ. ना. परांजपे

वस्तुतः मानवी जीवनशाश्वतीच्या कक्षा या बहुअल्प प्रमाणांत सीमित अशाच आहेत. मनुष्यानें जगांत यावें, ब्रह्मलेखानुसार त्याचा सुखदुःखोपभोग घ्यावा अन् कालावधि संपतांच किंबहुना त्याच्याही अगोदर ऐन रंगलेला संसारपट गुंडाळून जगाचा निरोप घ्यावा किंवा एखाद्या वेलीवर स्वच्छंदपणें हिंदळणारें फूल निमिषार्धांत पाकळी विरहित व्हावें, हा जो एक क्षणभंगुरपणाचा अपरिहार्य भाग प्राणीमात्राच्या जीवनांत आहे. त्यामागील विधिसंकेत लक्षांत घेऊनच श्री. अ. ना. परांजपे ह्यानीं आपल्या पुस्तकाला 'अळवावरचें पाणी' हें सार्थ नांव दिलें असावें. श्री. परांजपे ह्यांची संपूर्ण हयात वृत्तपत्रसृष्टीशीं निगडित आहे. त्यांना आजवर आलेले कडु-गोड अनुभव रोचक व बोचक शैलींत निवेदन करणें हा या पुस्तकाचा एकमेव विषय आहे. त्यांच्या नोकऱ्यांचा नंबर लक्षांत ठेवणेंही एकवेळ जड जाईल किंवा त्यांच्याच शब्दांत सांगायचें झाल्यास त्यानीं अनेक नवरे केले! परंतु प्रत्येकवेळीं काडीमोड घेऊन नवीन पाट लावण्याचा प्रत्यय मात्र वारंवार येतो.

उदरनिर्वाहासाठीं केवळ पोटभरू जिणें जगणें, त्यांच्या ध्येयनिष्ठ प्रवृत्तीच्या चौकटींत बसण्यासारखें नसल्यामुळें संघर्ष हा त्यांच्या जीवनाचा एक अविभाज्य घटक बनून राहिला आहे. स्वतःसंबंधीची कौटुंबिक कर्तव्यें आबाधित राखण्याची त्यांनीं दक्षता घेतली आहे. गांधीप्रणीत तत्त्वांवर त्यांची श्रद्धा आहे. वेदोक्तींना तें सक्रियतेनें आचरणांत आणूं पाहतात. संशोधक वृत्ति, विद्याव्यासंग, स्वामिभक्ति, सडेतोडपणा, प्रयत्नशीलता इत्यादी व्यक्तिमत्वाचे अनेकविध पैलू त्यांच्या अनुभवचित्रणांत प्रकर्षानें व्यक्त झाले आहेत. प्रापंचिक मोहाचें अनावर आकर्षण त्यांना कर्तव्यच्युत करूं शकलेलं नाहीं. परंतु त्यांच्यातला अंतस्थ पत्रकार मात्र सतत अस्वस्थावस्थेंत राहिला आहे. त्याला स्वस्थता कशी ती लाभलीच नाहीं. विशेषतः यातच परांजप्यांच्या जीवन-तपश्चर्येचें मर्म आहे; यश आहे. एका अनुभवी पत्रकाराचा हा जीवनवृत्तांत उद्बोधक असल्यामुळें आणि वाङ्मयीन संकेत सांभाळूत तो लिहिला गेल्यामुळ त्यास एकप्रकारें चांगला साहित्यिक दर्जा प्राप्त झाला असल्याचें प्रांजळपणें कबूल करायला पाहिजे. त्याचप्रमाणें त्यांचे हे अनुभव संकलित करून ग्रंथरूपानें वाचकांस उपलब्ध करण्याची जबाबदारी श्रीराम प्रकाशनाच्या चालकांनीं पत्करल्याबद्दल त्यांनाही धन्यवाद देणें एका परीनें कृतज्ञतेचें लक्षण ठरेल.

-प्रेमानन्द वळवईकर

[ श्रीराम प्रकाशन, ठाकुरद्वार, मुंबई २, किंमत रु. ३ ]

\+ \+ \+

मार्गदर्शक

## दि परफेक्ट इंग्लिश टीचर

सर्वसामान्य महाराष्ट्रीय मनुष्यास एस्. एस्. सी. पर्यंतचें महागरें इंग्रजी शिक्षण घेणें परवडत नाही. कित्येकजण या ना त्या कारणानें मध्येंच शाळेस रामराम ठोकतात. तसेंच खालच्या वर्गांना इंग्रजीत विषय नसल्यामुळें त्यांची इंग्रजीशीं तोंडओळखहि नसते. अशा अर्धवट इंग्रजी माहीत असलेल्यांना अगर मुळींच इंग्रजी येत नसलेल्यांना इंग्रजीची ओळख होण्यासाठीं वा वाढविण्यासाठीं म्हणून हा दोघां तज्ञानीं 'दि पर्फेक्ट इंग्लिश टीचर' तयार केला आहे व त्यांच्या उद्देशाच्या दृष्टीनें तो 'पर्फेक्ट' आहे. हें पुस्तक प्रसिद्ध करून श्री. कोठावळे यानीं विद्यार्थ्यांना फार मोलाची मदत केली आहे.

लेखक : व्ही. एम्. भाटे, एस्. जी. गुप्ते
प्रकाशक :- केशव कोठावळे प्रकाशन, मुंबई ४. मूल्य रु. ३.



## साहित्य-स्वीकार

लोकसत्तेला दण्डसत्तेचें आव्हान.
पु. ग. सहस्रबुद्धे कि. ६-००
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २

पाषाणपूजा-वि. स. खांडेकर ,, ५-००
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २

शामराई-शामराव निळकंट ओक ,, ५-००
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २

मराठी कथा-संयोजक
अरविंद गोखले कि. ३-५०
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २

अंतर-बलराज नांगरे ,, ३-००
अभय प्रकाशन, पुणें २

शक्तिकेतू-गं. रा. फाटक ,, १-००
अभय प्रकाशन, पुणें २

स्वगत-कुसुमाग्रज ,, ३-५०
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २

रुमीच्या नीति कथा-श्रीपाद जोशी ,, ३-५०
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २

जाई-बा. द. सातोस्कर ,, ४-००
सागर साहित्य प्रकाशन, मुंबई ४

शिळान-उद्धव ज. शेळके ,, ५-००
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ७

मामाचा वाडा-श्री. ज. जोशी ,, ४-५०
मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४

अलगूज-अण्णाभाऊ साठे ,, ४-००
मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४.

कर्णायन-गो. नि. दांडेकर ,, ५-००
मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४

पु. भा. भावे यांच्या निवडक कथा
पु. भा. भावे. ,, ६-००
बा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई २

मेषपात्रें-विजय तेंडुलकर ,, ३-७५
बा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई २

द्वंद्व-विजय तेंडुलकर ,, ४-००
बा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई २

'स्फूर्तिची फुलें' या सदरासाठी प्रकाशक-लेखकानीं पुस्तकाच्या दोन प्रति पाठवाव्यात. निश्चित अभिप्राय देण्यास त्यामुळें अडचण पडत नाहीं. १ च प्रत पाठविल्यास फक्त पोंच देण्यात येईल.

-संपादक













अनुक्रमणिका



# कों|ब|डा

**मॅक्सिमो बाँटेम्पेल्लीं हे इटालियन साहित्यांतील अग्रगण्य कथाकार. सामान्य घटनांतून गूढवाद निर्माण करण्याची त्यांची हातोटी विलक्षण. त्यांच्या अशाच एका कथेचा श्री. शां. शं. रेगे यांनी केलेला सरस अनुवाद.**

ल्यु सिआनोनें गांवातून आपल्या मित्रांना पाठविलेला सुंदर कोंबडा हा एक कौतुकाचा विषय झाला होता. कोंबडा जेव्हां आला तेव्हां हे मित्रगण—म्हणजे आजोबा, आई आणि सॅंड्रिनो टेबलावर जेवायास बसलेले होते. भोजनकक्षाच्या दाराशीं आलेली डॉलरेस ही बातमी मोठ्यानें सांगतांना उत्साहानें क्षुब्ध झाल्यासारखी वाटली. तावडतोब तीं तिघें भरल्या पानावरून उठून सैंपाक घरांत कोंबडा पाहण्यासाठीं धांवलीं. कोंबडा भांडीं विसळण्याच्या चिनीमातीच्या हौदाखालीं दडून बसला होता. दरवाजांतून उत्सुकतेनें पण निःस्तब्धपणें डोकावणाऱ्या त्या तीन कुटुंबियां-कडे झटक्यानें मान वेळावित निःस्तब्धपणे ताठ उभा राहून तो मधून मधून नजर फेकित होता.

डॉलरेस सुद्धां गपचूप उभी होती पण ती भिऊन नव्हे. तिला गांवची आठवण होऊन खुशीचें हास्य तिच्या चेहऱ्यावर ओसंडत होतें. तिला कांहींतरी सांगायचे होतें पण योग्य शब्द मात्र सुचत नव्हते. आपल्या धन्याची संशयी दृष्टि तिला हास्यास्पद वाटत होती. अखेरीस आजोबानीं त्या निःस्तब्धतेचा भंग केला. 'तो कोंबडा दिसतोय. प्राणिशास्त्रांत त्याला 'गॅलस क्रिस्टॅटस' असे नांव आहे' आजोबा म्हणाले. आजोबांचे हें बोलणें संपते न संपतें तोच सॅंड्रिनोने एकदम त्या कोंबड्याकडे झेप घेतली. पण कोंबड्यानें अचानक अशी उडी मारली कीं सॅंड्रिनोच्या आईनें भीतीनें एकदम सॅंड्रि-नोची बखोटी पकडून त्याला मागें ओढलें.

डॉलरेस हंसत हंसत सैंपाकघरांत शिरली आणि हौदाखालीं दडलेल्या शत्रूवर झेप घालून तिनें त्याचे एकदम पाय पकडले आणि त्याला जणूं विजयानें उंच उचलला. उलट्या लोंबकळत असलेल्या त्या कोंबड्यानें आपलीं पिसाळ मान झटकली आणि काचेच्या गोट्यांसारखे चमकणारे डोळे मिचकावले. डॉलरेस म्हणाली, 'मारू या का त्याला आतां !' दरवाजांत उभ्या असलेल्या त्या त्रिकुटाच्या शरीरांत शहाऱ्याची एक लाट चमकून गेली. डॉलरेसच्या उत्साहावर विर-जण घालण्याची एक युक्ति चटकन् आईला सुचली. 'बाबा येईपर्यंत आपण थांबू या, ते उद्यां सकाळींच येतील' ती उद्गारली. सॅंड्रिनो आणि आजोबा एकाच सुरांत एकदम बोलले, 'होय होय', डॉलरेस म्हणाली, 'बरं तर. उद्यां. धनीसाहेबांनीं पाहिल्याबरोबर आपण त्याला मारू आणि रविवारची खास मेजवानी साजरी करूं.' 'पण उद्यापर्यंत त्याला ठेवायचा कुठे ?'

पुष्कळ सूचनांची चर्चा झाली आणि अखेरीस डॉलरेसची कल्पना सगळ्यांना पसंत



अनुक्रमणिका

पडली–दरवाज्याच्या वाटेवरच्या सज्जांत त्याला ठेवावा. तिनें त्याला उचलला. त्याच्या एका पायाला दोरी बांधली सँड्रिनो म्हणाला, 'दोरी जरा लांबच असूं दे म्हणजे त्याला अडचण वाटणार नाहीं, डॉलरेमनें तसें केलें आणि त्याला खालीं सोडला. सगळेजण त्या सुंदर पक्षाकडे खिडकींतून पाहूं लागले. जणुं काय सृष्टीचा मध्यबिंदु आपणच आहोंत या भावनेनें तो कोंबडा डौलानें सज्जाच्या मध्यभागीं निःस्तब्ध उभा राहिला होता.

गांवाहून आपल्या शहरी दोस्तांना कोंबड्यांची भेट पाठवायची ल्युसिआनोची कल्पना जरा विचित्रच होती. पण कसेंही असलें तरी भेटीबद्दल त्याचे आभार मानणें प्राप्त होतें. म्हणून आई पत्र लिहिण्यास खोलींत गेली. सँड्रिनो अभ्यासास बसला आणि आजोबा निजावयास गेले. पंधरा मिनिटाच्या आंतच सँड्रिनो चवड्यावर चालत गुपचूप सज्जाकडे गेला. तिथें तो पोंचतो न पोंचतो तोंच त्याला मागें सळसळ ऐकूं आली म्हणून त्यानें मागे वळून पाहिलें तों त्याला आई दिसली. तीहि हळूच त्याच उद्देशानें तिथें आली होती.

"काय रे, तुला अभ्यास करायचा नाहीं वाटतं ?'

"--आणि आई, तुझं पत्र लिहून झालं वाटतं ?"

ती दोघेजण हंसत हंसत मागें वळली आणि आपापल्या कामासाठीं जाऊं लागली तोंच त्यांना आजोबांच्या खोलीचे दारही हालतांना दिसलें.

रात्रींच्या जेवणाच्या वेळीं ते तिघेजण कांहीं निमित्त न शोधतां सज्जांतला कोंबडा पहावयास खिडकींतून डोकावूं लागले. ताठ मानेनें व दुष्ट नजरेनें तो कोंबडा आतां सज्जांत इतस्ततः फिरत होता. सज्जा हा जणुं झुंजण्याचा आखाडा आहे असे मानून तो लढाऊ वृत्तीनें वागत होता. डॉलरेसनें एका कोपऱ्यांत त्याच्यासाठीं खाणें घालून थाळी ठेवली होती. पण कोंबड्यानें तिकडे ढुंकूनहि पाहिलें नव्हतं.

आजोबा सांगत होते, 'कोंबडा हा सर्व प्राण्यांत अगदींच निर्बुद्ध समजला जातो.'

सँड्रिनो म्हणाला, 'तो अगदीं स्वतःवरच खुप दिसतोय.'

आई एक दीर्घ निश्वास टाकत म्हणाली, 'बिचारा, कालच गांवीं आपल्या कोंबड्यांसह तो स्वातंत्र्यात मिरवत होता आणि आज....'

इतक्यांत डॉलरेसही तिथें आली. कोंबडी हा आईचा शब्द ऐकतांच तिला रडूं कोसळलें.

'अं ! डॉलरेस, काय झालं ग ?' आई बोलली.

डॉलरेस रडता रडता म्हणाली, 'कांहीं नाहीं, बाई !' इतक्यांत तिचे हुंदके संपले होते आणि हाताच्या तळव्यांनीं डोळे पुसून ती एकदम बोलली, 'आपण त्याची मान मुरगळूं या कीं सुऱ्यानें गळा कापूं या ?' तिच्या डोळ्यांत एक प्रकारची चमक दिसत होती. आई पटकन बोलली, 'पण उद्यांवर आपण तो बेत ढकलला आहे ना !'

कोंबड्याचे संथपणें फिरणें चालूच होतें. तो आपल्याला बंदिस्त करणाऱ्या त्या दुष्ट मानवांकडे बघतहि नव्हता. मावळत्या सूर्याचें किरण त्याच्या पिसाऱ्यावर पडून लाल लाल पिसें चमकत होतीं. डॉलरेसनें एकदम सज्जाची खिडकी उघडली. आवाज कानीं पडतांच कोंबड्यानें मान वळवून मागें पाहिलें, सूर्याचे किरण आतां त्याच्या तुऱ्यावर आणि गळ्यावरच्या लोंबत्या भागावर पडून तो सुंदर दिसत होता. तो तोऱ्यानें फिरत होता. त्याची बांकदार शेपटी जणुं हवा कापीत जात होती, रागानें त्याची छाती फुगून तट्ट झाली होती.

आई म्हणत होती, "मला खरंच वाटत नाही कीं कधींकाळीं अंड्यांतून बाहेर पडलेल्या छोट्या पिल्लाचा–पिवळ्या पिल्लाचा असा गिरेबाज कोंबडा होऊं शकेल."

आजोबा माहिती सांगत होते '—खिस्तकालापूर्वी चीनमधून प्रथम युरोपांत कोंबड्याची आयात झाली '

आई सँड्रिनोकडे वळून बोलली, 'बाळ, तूं गप्प कां रे तुझ्या मनांत कांहीतरी विचार चाललेत- -'

सँड्रिनो उत्तरला '--तो फारच चिडलेला दिसतोय. '

इतक्यांत त्या कोंबड्यानें एक उंच उडी मारून कोपऱ्यातल्या स्टुलावर तो उभा राहिला व ऐटीनें मान हालवून बघू लागला.

'अरे देवा !' डॉलरेस घाबरून एकदम ओरडली. आणि त्या कोंबड्याला स्टुलावरून खालीं पाडण्यासाठीं ती धांवली. तिनें तें स्टूल तिथून उचललें. सज्जाच्या कठड्याकडे बोट दाखवीत ती म्हणाली, 'तो जर पुन्हां असा उंच चढला असता तर ह्या कठड्यावरून केव्हांच निसटला असता !'

तिचें म्हणणें बरोबर होतें. कठडा जमिनीपासून विशेष उंच नव्हता आणि बाहेरच्या बाजूला वाढलेली झुडपें होती आणि पुढेंही सरळ दुतर्फा झाडीच होती. 'बरें झालें मी धांवले म्हणून. ते स्टूल जर तिथून हालवलें नसतें तर रात्रीं तो सहज पसार झाला असता ' डॉलरेस कौतुकानें म्हणाली. कोंबड्यानें जणुं हें ऐकल्यासारखें दर्शवून रागानें डॉलरेसकडे बघितलें–प्रथम एका डोळ्यानें आणि मग दुसऱ्या. त्याची ही बघण्याची तऱ्हा जरा विचित्रच होती.

एक दोन तासांतच त्या सज्जावर संध्याकाळच्या लांब लांब सावल्या वाढत वाढत गेल्या. त्या सज्जावर –आणि कोंपऱ्यांत ठेवलेल्या आपल्या थाळींतल्या अन्नाला स्पर्श न करणाऱ्या त्या कोंबड्यावरही.

"रात्रीं तो खाईल कांहीतरी."

"त्याला समजलें पाहिजे कीं आजचें जेवण हें त्याचें अखेरचें. मग उगाच उपास कशाला ?"

रात्रीं सर्वजणांनीं न बोलतां जेवण केलें आणि तोबडतोबच सर्व झोंपायला निघून गेलीं.

दुसऱ्या दिवशीं, नेहमींप्रमाणें बरोबर सात वाजतां सर्वजण चहाफराळाकरतां भोजनगृहांत जमले. "गुड मॉर्निंग", "गुड मॉर्निंग", "गुड मॉर्निंग." प्रत्येकजण दुसऱ्याची नजर चुकवत होता आणि तें स्पष्टच होतें. सकाळीं डॉलरेस बाजारांत जात असल्यामुळें आईच चहाफराळ तयार करीत असे. आणि आज कॉफी बनवतांना दुधाचें प्रमाण जणुं तोलूनमापून घालण्यांत आई विशेष लक्ष घालतांना दिसत होती. कोंबड्याला 'गुड मॉर्निंग' करण्यासाठीं सज्जाकडे जाण्याचा कुणाचाच विचार दिसत नव्हता. कोणीही एक शब्द बोलत नव्हता.

इतक्यांत भाजीसामानाची पिशवी घेऊन आलेली डॉलरेस धापा टाकीतच बोलली, "मी इतक्या घाईनें सकाळीं बाजाराला गेलें कीं कोंबड्यानें रात्रीं कांहीं दाणापाणी घेतलें कीं नाहीं तें बघायचेंच राहून गेलें. भरल्या गळ्यानें त्याला मारून उपयोग नाहीं. धनीसाहेब केव्हां येणार आहेत ?" आणि उत्तराची









## ‘सवतीमत्सर’

बाळपणी वरिले, वरिले त्यांना मी,
वाटला जोडिदार नामी ॥ १ ॥

प्रेम बहु केलं, केले मजवरती,
वाटले भाग्यवान मी ती ॥ २ ॥

वाटले नव्हते, नव्हते मजलाही,
सहज हे बघति कुणालाही ॥ ३ ॥

नेम हो कुठला, कुठला पुरुषांचा,
छंद कधि लागे नारीचा ॥ ४ ॥

सासरा बोले, बोले मुलालागी,
शोभते ना तुज अर्धांगी ॥ ५ ॥

फूल दे सासू, सासू सासऱ्याला,
म्हणे मी नको आसऱ्याला ॥ ६ ॥

जीव हा येई, येई रंजीस,
सदा ती ऐकूनी धुसपूस ॥ ७ ॥

नको ते होई, होई बघा तेही,
आणिली सवत मला ती ही ॥८॥

मनाला वाटे, वाटे खेद भारी,
झुरत मी मनामधे भारी ॥ ९ ॥

जून मी झाले, झाले कुचकामी,
बोलती, नवी उंच नामी ॥ १० ॥

लोटिले दूर, दूर जवानीत,
पडत मी मागिल पडवीत ॥ ११ ॥

अर्धांगी बनली, बनली प्रेमबांडी,
अशी मी विजार ही लांडी ॥१२॥

— पण्डित महाजन

वाट न पाहातांच ती सज्जाकडे धांवत गेली. सँड्रिनो कॉफी अर्धवटच टाकून टेबलावरून उठला, ’ झाला ! मला शाळेंत धांवतच गेलं पाहिजे ! ’ असं बोलत बोलत दार धाडकन बंद करून तो बाहेर पडलाहि. आजोबाही “ माझा चष्मा कुठें राहिला कुणास ठाऊक ?” असं पुटपुटत त्यांच्या खोलीकडे धांवतच गेले.

आई घडवंचीवर ठेवलेले पेलेबश्या वगैरे सामान मोजण्याच्या मिषानें तिथं घुटमळत राहिली. तिचें कान तीक्ष्ण होते. तिचं लक्ष जरी घडवंचीकडे असल्याचें दिसत होतें तरी कानानें ती डॉलरेसची बाहेरची हालचाल टिपत होती. दरवाजाजवळची खुर्ची सरकवल्याचा आवाज आला. आतां दोन पावलें....आणि दरवाजाची कडी काढली जाईल. डॉलरेस आतां दरवाजा उघडत होती. क्षणभर सर्व निःस्तब्ध झाले आणि मग सज्जांत डॉलरेसची एकच मोठी किंकाळी सर्व आंगण घुमवून गेली. ‘ बाई, बाई ’ डॉलरेस ओरडत होती. “ अरे, बापरे...”

क्षणांत ती आंत आली आणि आईच्या हाताला धरून फरफटत तिनें तिला सज्जाच्या खिडकीकडे नेले. मोकळ्या सज्जाकडे तिनें बोट दाखवलें–तुटलेल्या दोरीकडे आणि बाहेरच्या कठड्याकडे–

‘तो पळाला–त्यानें दोरी तोडली. मी कालच सांगितलें होतें........ हाय हाय !’ तिनें निःश्वास टाकत उद्गार काढले आणि कठड्याला बांधलेली दोरी तपासायला ती खाली वाकली.

‘दोरीला कुठं कापल्याचे व्रण पडलेले दिसत नाहींत. कुणीतरी चाकूनें किंवा कातरीनें ती नीट कापल्यासारखी दिसते. कोणाचे धंदे हे ? मी नाही हं, केला हा उद्योग ! ’ ती जणूं क्षमायाचनेच्या स्वरांत बोलत होती.

आईने तिच्या हाताची पकड सोडवून कांहीतरी ऐकण्याचे निमित्त केलें. ‘आलेंच हं ! आजोबा हांक मारताहेतसं वाटतं–’ असें बोलत आई आजोबांच्या खोलीकडे धांवली आणि तिनें दार लावून घेतलें.

त्या उघड्या सज्जांतल्या त्या उघड्या खिडकीकडे त्या तुटक्या दोरीजवळ उभी असलेली डॉलरेस एकटीच राहिली. अज्ञात असलेल्या विचित्र वस्तू व विचित्र लोक असलेल्या ह्या जगांत तिला आपल्या एकले-पणाची जाणीव झाली. सभोंवतालचें सर्व विश्व फिरूं लागलें होतें. घराच्या भिंती तिच्या अंगावर जणूं कोसळून पडताहेत असें वाटून ती घाबरून गेली. आपलें गांवी असलेलें सर्व कुटुंब अचानक मृत्युमुखी पडलें आहे असें तिला वाटून ती मोठमोठ्यानें रडूं लागली.

• • •





# हत्ती, सिंह व माणूस

*जोमो केन्याटा हे आफ्रिकेंतील एका जमातीचे राजकीय पुढारी. अनेक प्रकारचे छळ आणि देहदंड सहन करून त्यांनीं आपलें राजकीय महत्व सिद्ध केलें आहे. त्यांनीं स्वानुभवावर लिहीलेली ही एक हृदयस्पर्शी बोधकथा. त्यांच्या या कथेचा श्रीं.* **सदानंद चेंदवणकर** *यांनीं केलेला अनुवाद.*

एका जंगलांत झोपडी बांधून एक मनुष्य रहात होता. रानावनांतील कंदमुळं फळं खाऊन तो आपला उदरनिर्वाह करी. त्या रानांतील एका हत्तीनें त्या माणसाची मैत्री केली. दर दिवशीं तो त्या माणसाच्या झोपडीकडे येई. त्याने कांही खावयास दिलें तर तें खाई, त्याच्याशीं गप्पागोष्टी करी आणि मग जंगलांत निघुन जात असे.

एकदां त्या जंगलांत तुफान वारा व पाऊस सुरूं झाला. गारांचा मारे वर्षाव होऊं लागला. रानांतले सारे पशुपक्षी भयभीत होऊन कुठे-तरी लपून बसले. पण हा एवढा थोरला हत्ती तो कुठें लपणार ? हत्ती आपल्या झोपडींतील मित्रापाशीं आला आणि मोठ्या काकुळतीनें म्हणाला, ‘ मित्रा, माझें या भयंकर वादळ–पावसापासून संरक्षण कर. निदान कसंहि करून माझ्या सोंडेला जरी आपल्या या झोंपडीत आसरा दिलास तरी तुझे मजवर खूप खूप उपकार होतील. ’

खरोखरच हत्तीची ती शोचनीय अवस्था बघून त्या माणसाला दया आली आणि तो म्हणाला, भाई, माझी ही झोपडी तर अगदींच छोटी व मामुली आहे, अन तींत माझें व तुझ्या या लांबच लांब सोंडेचें संरक्षण तरी कसें होणार ! तरी पण तूं या झोंपडीत तुझी सोंड मोठ्या सावकाशीनें सरकव.

माणसाने केलेली कृपा बघून हत्तीने कृतज्ञता प्रकट केली आणि पुढें त्याच्या कृपाऋणांतून मुक्त होण्याचा वायदा पण केला.

परंतु हाय ! दुर्दैव त्या माणसाचें. झोपडींत आपली सोंड. शिर-कावण्याची अनुमती मिळतांच हळूंहळूं हत्तीनें आपले शीरहि आंत घुसण्यास सुरुवात केली आणि शेवटी थोड्याच अवधीत बिचाऱ्या माणसाला आपल्या सोंडेने उचलून झोपडी बाहेर फेकून दिलें.

बाहेर जोरदार वृष्टि होतच होती. हत्ती आंतून म्हणाला, ‘ए प्रिय मित्रा, या झोपडींत आपल्या दोघांचा कांही निभाव लागणें शक्य नाही. तसा तूं अगदीं लहान आणि चपळहि असल्यानं पावसाचा कितीहि कां मारा होईना तूं सहज चुकवूं शकशील नाही का ? ’

कांहीं वेळाने पाऊस थोडा कमी झाला. गजमित्राने केलेल्या विश्वासघातकी कृत्यामुळें चिडून जाऊन कीं काय त्या माणसानें हत्तीला घालविण्यासाठी खूपच आरडाओरडा केला. तो ऐकून जंगलां-तील आजूबाजुचे पशु काय झालें हें पहाण्यासाठीं घटना स्थळीं आले. वर्तुळाकार उभे राहून ते जंगलातील आपल्या त्या दोघां दोस्तांची कैफियत ऐकण्यास मोठे उत्सुक झाले होते.

इतक्यांत एक सिंह गुरगुरत तिथें आला आणि म्हणाला, समजत नाहीं, मी या जंगलाचा अधिपति आहे. माझ्या साम्राज्यांत नांदत असलेल्या शांतीचा तुम्ही लोक भंग करीत आहांत.’

सिंहराजाची कोपमुद्रा बघून गजराज पुढे होऊन नम्रपणे म्हणाला, ‘ महाराज, माझ्या छोट्याशा झोपडीसंबंधीं थोडा वाद निर्माण झाला आहे.’

आपल्या साम्राज्यांत शांतीची इच्छा बाळगणारा तो सिंह त्यावर हुकमी आवाजांत म्हणाला, अस्सं होय ! तर मग मी माझ्या मंत्र्याला अशी आज्ञा करतों कीं या प्रकरणाची चौकशी करण्यासाठीं एक खास मंडळ नेमावें व त्या मंडळानें लौकरांत लौकर आपला अह-वाल सादर करावा.

नंतर सिंह त्या माणसाकडे वळून म्हणाला, ‘ माझ्या प्रजेशीं, विशेषतः माझा मंत्री जो हत्ती त्याच्याशीं तूं केलेली मैत्री बघून मला आनंद वाटतो. परंतु कांही झालं तरी पुढें हत्तीशी मात्र वितुष्ट आणूं नकोस हो ! तुझी झोपडी कांही तुजकडून हिरावून घेण्यांत आलेली नाही. तेव्हां मंडळाचा अहवाल येईपर्यंत तूं अगदीं स्वस्थ रहा. त्या मंडळासमोर तुलाहि आपली बाजू मांडण्याची परवानगी देण्यांत येईल नि मंडळाच्या निर्णयाने तुझें केव्हांहि समाधान होईल असा विश्वास वाटतो.’

जंगलच्या राज्याने दिलेलं आशायुक्त आश्वासन ऐकून बिचारा मनुष्य अगदीं खूप झाला, आणि बळे बळे ओढून घेतलेली आपली झोपडी आपल्यालाच परत मिळणार या आशेनें तो मंडळाच्या निर्णयाकडे डोळे लावून बसला.

आपल्या वनराजाची आज्ञा शिरसावंद्य मानून मंत्री महाशय गजराजानें त्या प्रकरणाबाबत चौकशी मंडळ नेमण्याचें ठरवून



अनुक्रमणिका






त्यांत गेंडे महाराज, रेडे महाराज, तरस महाराज इत्यादि बड्या धेंडांची सभासद म्हणून भरती केली. माननीय कोल्होबा अध्यक्षपदीं आणि चित्तेमहाराज चिटणीसपदीं निवडले गेले.

मंडळांतील त्या साऱ्या सदस्यांना बघून माणसाला मोठें आश्चर्य वाटलें आणि तो विरोध करीत म्हणाला, 'या मंडळांत माझ्या-तर्फेचें कुणींच नाही हें कसें काय ? माझ्या बाजूचे, माझ्या पक्षाचे पण लोक अवश्य घेतले जावेत.'

परंतु त्याला, 'तुम्ही माणसं म्हणजे अगदीच अडाणी आहांत. या जंगलांतील कडक कायदेकानूंची तुम्हांला कांहीं माहिती नाहीं. तेव्हां ती गोष्ट कांही संभवत नाही. मात्र असें असलें तरीं घाबरण्याचे कांहीं कारण नाहीं. या मंडळींतील सारेच सभासद निःपक्षपातीपणाने न्यायनिवाडा करण्यांत सुविख्यात असेच आहेत. असहाय्यांना सहायता करण्यांत आणि दुर्बलाना धीर देण्यासाठींच ईश्वरानें साऱ्यांना मोठमोठे दांत आणि नि लांब लांब नखें दिली आहेत. तूं अगदीं निश्चिंत रहा. तुझ्या झगड्यांत ते सर्व काळजीपूर्वक लक्ष घालतील' असें परोपरीनें त्याला सांगण्यांत आलें.

योग्य वेळीं एकंदर प्रकरणाची चौकशी सुरूं होऊन वादी–प्रतिवादीची कैफियत ऐकण्याकरितां मंडळाची बैठक बसली. प्रथम हत्तीला आपली बाजू कथन करण्याची संधि देण्यांत आली. सौभाग्यवती हत्तीणबाईने दिलेल्या लाकडाच्या ओंडक्यावर आपले दांत चांगले घांसून पुसून स्वच्छ करून मोठ्या रुबाबांत मंडळासमोर येऊन हत्ती म्हणाला, 'या जंगलातील महाभागांनो, साऱ्या इत्थंभूत कथेची पुनरावृत्ति करून मी तुमचा वेळ दवडूं इच्छित नाही. तुम्हीं सर्वजण चालू घटनेची परिचित असालच असा मला विश्वास वाटतो. मी आपल्या स्नेह्याचें हित साधणे हें आपलें कर्तव्य समजतो. माझ्या या मित्राचा माझ्या बाबतींत थोडा गैरसमज झाला आहे. माझ्या मित्राने गारांच्या घोर वर्षावापासून आपल्या झोपडीचें रक्षण करण्यासाठीं मजकडून सहाय्य मागितलें होतें. सोसाट्याच्या वाऱ्याने झोंपडीकडील अर्धें-अधिक छप्पर उडून गेल्यामुळें सारी झोंपडी अगदीं उजाड झाली होती. जिकडे तिकडे पाणीच पाणी झाले होतें. केवळ आपल्या मित्राच्या हिताकरितां त्याच्या विनंतीला तात्काळ मान देऊन त्याच्या अडलेल्या वेळीं त्याला साहाय्य करणें हें कर्तव्यकर्म समजून मी त्या झोपडीचें संरक्षण करण्यासाठीं म्हणून आश्रय घेतला होता. सद्गृहस्थ हो, तुम्हांला जर अशा परिस्थितीला तोंड द्यावें लागतें तर तुम्हींहि असेंच केलें असतें नाही का ? आपले कर्तव्यकर्म मी बजावलें यांत मला समाधानच वाटतें.

हत्तीचें हें कथन ऐकून तरस महाशय, आणि कांही सदस्यांनी माना डोलावल्या.

यानंतर माणसाला आपली बाजू मांडण्यासाठीं वेऊं देण्यांत आले. तो बोलूं लागला तो इतक्यांत अकस्मात त्याला मध्येंच अडथळा करून मंडळानें सांगितले, 'भाई, मोठी लांबलचक कहाणी कांहीं सांगू नकोस. अगदी आवश्यक जरूर त्याच गोष्टी पटापट सांग बरं ! या प्रकरणाची सारी सारी ती माहिती विविध साधनांनीं नि अगदी निःपक्षपाती बुद्धीने आम्ही यापूर्वीच गोळा केली आहे.

मंडळाने असें त्या माणसाला सुचविलें तरी माणूस आपला पुढें जास्तच बोलत राहिला. तेव्हां मंडळानें मध्येंच थांबवून त्याला विचारलें, 'मित्रा, तें सर्व कांहीं आतां राहूं दे. हत्ती येण्यापूर्वी तुझ्या त्या उजाड झालेल्या झोंपडींत कुणी रहात होतें का ?'

माणसाने सांगितलें, 'नाहीं. परंतु......'

त्याचे पुढचे शब्द तोंडांतच राहिले.

चौकशी मंडळानें तें ऐकताच ताबडतोब घोषणा केली कीं, 'आम्हीं दोघां पक्षांची हकिगत ऐकून घेतली आहे. आतां सल्लामसलती करितां बैठक स्थगित केली जात आहे.'

बैठक उठून गेल्यावर हत्तीनें चौकशी मंडळाला मोठ्या थाटाची मेजवानी दिली. मेजवानीनंतर तंट्याचा निर्णय सुनावण्याकरितां हत्ती आणि त्या माणसाला बोलावण्यांत आले.

आमच्या मतें या साऱ्या झगड्याचें मूळ कारण माणसाचा असमंजसपणा आहे आणि त्यामुळेंच हा एवढा सारा गैरसमज निर्माण झाला आहे. माननीय गजराजानें केवळ आपल्या मानवमित्राच्या हिताकरितांच आपले कर्तव्यकर्म समजून आपल्या शक्तिनुसार झोपडीचे संरक्षण करण्याकरितां तेथें आश्रय घेतला होता असें आतां आमचें ठाम मत झालें आहे. यावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं, माणसाच्या भलाईकरितां त्याच्या झोपडीतील खोलीचा उपयोग जास्तीत जास्त चांगल्या प्रकारें करतां येईल तेवढें करण्यासाठी म्हणून त्यानें केला. एकटा मनुष्य कांहीं सबंध झोपडी आच्छादूं शकणार नाहीं. तेव्हां उभयतांचा समाधानाकरितां समझोता करून देणं आवश्यक आहे असें आम्हांस वाटतें. समजोता असा कीं, माननीय गजराजांना माणसाची झोपडी दिली जावी आणि माणसाला नवी झोपडी बांधण्याला या जंगलातल्या वाटेल त्या जागेबाबतची परवानगी मिळावी, त्याशिवाय त्या माणसाला आमच्या सरकारकडून यथाशक्ति सर्वतोपरी संरक्षण मिळेलच.'

एकंदरीत लागलेल्या या निर्णयामुळें कपाळावर हात मारून घेण्यापलीकडे तो माणूस वन्य श्वापदांच्या त्या राज्यांत अधिक तें काय करूं शकणार !

●●●

# दीपमाला




## थोडेसे प्रगटचिंतन

दीपावलीचा प्रस्तुत अंक सादर करतांना रसिक वाचकांच्या कृपालोभाचें एक ऋण फेडल्याचा आम्हाला आनंद होतो आहे. आजकाल कांहीं मासिकें चार अधिक पानें (जाहिरातींची) घालून, आगाऊ जाहिरात केल्याप्रमाणें सव्वा दीडपट किंमत वाढवून मागील तूट भरून काढण्यासाठीं अगर आपली गंगाजळी वाढविण्यासाठीं भगीरथप्रयत्न केल्याचा आव आणत असतात. कांहींचें वर्षांत असे नऊदहा खास अंक निघतात तर हवामानाच्या कोष्टकानुसार, पंचागांतल्या ऋतुमानानुसार अथवा स्थानिक व राष्ट्रीय कालमानानुसार कांहींचे खास अंक वार्षिक संकल्पाप्रमाणें प्रकाशित होत असतात. खास अंक म्हटला म्हणजे त्याची आगामी जाहिरात करणें खरेदीदारांच्या व जाहिरातदारांच्या दृष्टीनें आवश्यक असतें. ह्या जाहिरातीसाठीं कांहीं ख्यातनाम, कांहीं वजनदार व कांहीं तथाकथित लेखकांच्या लेखनसहाय्याचें आमिष लावणें प्राप्त असतें. पण अंक प्रसिद्ध झाल्यावर ह्या नामसंकीर्तनांतलें नाममहात्म्य फळाला आलें नसल्याचें वाचकाला प्रगटपणें आढळतें व महिनाअखेर अंकाच्या पोथ्या एजंटांच्या इंद्रायणीत तरतच राहिल्यामुळें आपण 'अक्षरशः' बुडाल्याचें संपादकाला कळतें. पण सताहानें 'फिरून एकदां धीर धरून' उशिरां आलेल्या आवाहित साहित्याचें आणि आगाऊ आलेल्या अनाहूत लिखाणाचें भांडवल करून पुढील खास अंकाच्या जाहिरातीला आणि तयारीला तो लागतो. ह्या खटाटोपांत कधींतरी सव्याज प्राप्ति होते तर कधीतरी वाढणारी तूट थांबविण्यासाठीं जोडअंक काढून मध्यंतरांत धनकोला सबब सांगण्याची आणि बुडव्या जाहिरातदाराला सवड काढून भेटण्याची उसंत मिळते. प्रामाणिक संपादकाच्या बाबतींत ही कहाणी निराळी असली तरी ती 'रामकहानी'च असते असाहि अनुभव आहे. वाचकांना नवनवीन कांहींतरी देण्याच्या प्रयत्नांत असल्या उपक्रमांचें नाविन्य साधण्यासाठीं आगाऊ अशा अंकाची तयारी करण्यासाठीं तो कसूर करत नाहीं. ख्यातनाम साहित्यिकांना पत्रें व स्मरणपत्रें लिहून लेखनिकांचे हात व ती पत्रें पोंचतीं करणाऱ्या पोस्टमनाचे पाय दुखले तरी हा लेखक आपला आळस झाडून पेन्सिल हातीं घेत नाहीं. विविध सबबी सांगूनहि संपादक विचलित होत नाहीं हें समजल्यावर एखाद्या जुन्यां मुद्रिताला प्रसंगोपात्त ठिगळ जोडून एखाद्या तद्भावी वक्तव्याला झालरकनातीनें विस्तारून अथवा एखाद्या अज्ञात परकीय प्रतिभावंताला अनृणित करून हा साहित्यिक, संपादकाच्या झोळींत फुटकळ व किरकोळ भिक्षा घालण्याचे दातृत्व दर्शवितो आणि तेंही मुदत टळून गेल्यावर. आणखी कांहीं साहित्यिक पावसाळ्यासाठीं अन्न गोळा करणाऱ्या मुंगीप्रमाणें 'दिसामाजीं कांहीं' लिहून भरपीक दिवाळी (अंका)ची बेगमी करून, वार्षिक उत्पन्नाचे बजेट फुलविण्याचें धोरण बाळगतात. कांहीं अपरिपक्व व कांहीं होतकरू लेखक अनाहूतपणें लेखन पाठवितात, पण वाचकांना आवाहन करण्याचें सामर्थ्य असूनहि स्पर्धेच्या आव्हानाचा विचार मनांत येऊन कित्येकदां संपादकांना हें सहकार्य नाकारावे लागते. मराठी वाचकांच्या बदलत्या (व कित्येकदां अनिष्ट) आवडी, ख्यातनाम साहित्यिकांचे असहकार्य व इतर व्यावहारिक अडचणी ह्यांना तोंड देतां देतां नाकीनऊं आलेला हौशी संपादक असल्या उपक्रमांस प्रवृत्त होतो ह्याचें कारण त्याची विजीगिषा आणि झुंजार मनोवृत्ति हेंच होय. मराठी साहित्याच्या व पत्रकारित्वाच्या इतिहासांत ज्यांची अभिमानानें गणना करता येईल असे अनेक ध्येयवादी संपादक होऊन गेले व आतांहि प्रयत्नशील आहेत. आणि हीच मराठी साहित्याची खरी थोरवी आहे.

'दीपावली' नें अशा तऱ्हेच्या साहित्यांत आजपर्यंतच्या आपल्या विविध प्रयत्नांनीं मौलिक भर घातली आहे हें रसिक वाचक मान्य करीलच. 'दीपावली' वार्षिकांनीं एकेकाळीं अनेक ख्यातनाम साहित्यिकांच्या सहकार्यानें दर्जेदार वाङ्मय प्रसिद्ध करून वाचकांमध्यें कुतुहल निर्माण केलें होतें. 'दीपावली' मासिकानेंही वेळोवेळीं प्रसिद्ध केलेले सुविहित अंक असेच लोकप्रिय ठरले आहेत. विशेषतः 'क्रिकेट,' 'महाराष्ट्र-महोत्सव,' 'भाषाभारती', 'क्रांतिसंस्मरण' व 'मुक्तगोमंतक' अंक हीं 'दीपावली' चीं उल्लेखनीय लेणीं ठरली आहेत. असे रसिक वाचकांनीं व समीक्षकांनीं वेळोवेळीं मान्य केलें आहे. ह्या उत्तेजनांमुळेंच

'दीपावली' असल्या नाविन्यपूर्ण योजना यशस्वी करण्यास प्रवृत्त झाली आहे, व होत राहील. प्रस्तुत 'अनुवाद' विशेषांक जाहीर करतांना पूर्वानुभवामुळें जी थोडीशी आशंका निर्माण झाली होती ती निराधार ठरली असें हा अंक सादर करतांना आम्हांला वाटतें त्याचें परिशीलन करणाऱ्या रसिक वाचकाला आणि सहृदय समीक्षकाला तें मान्य होईल अशी अपेक्षा आहे. आंतरराष्ट्रीय साहित्यापैकीं वेचक व दर्जेदार कथावाङ्मय अनुवादित करून सादर करण्याचा हा आमचा प्रकल्प यशस्वी ठरला आहे असे आम्हांला अभिमानानें सांगावेसें वाटतें. 'दीपावली'ला आजपर्यंत जसें अनेक ख्यातनाम साहित्यिकांनीं सहकार्य दिलें तसें प्रस्तुत अंकाच्या घोषणेच्या वेळींहि तें अपेक्षित होतें. प्रस्तुत अंकाच्या श्रेयनामावलीवरून ह्यावेळींहि हें सहकार्य पुरेपूर असल्याचा प्रत्यय वाचकांना येईलच. ह्या सर्व साहित्यिकांचे ऋण कृतज्ञतेनें मान्य करून त्यांनी असाच 'दीपावली'वर लोभ ठेवावा अशी त्यांना विनंति करतो. ह्या अंकाच्या यशापयशाबद्दल समीक्षक मतें व्यक्त करतीलच, पण रसिक वाचकांनींसुद्धां सढळ हातानें आपली प्रतिक्रिया कळवावी असें त्यांना नम्र आवाहन आहे.

× × ×

## साहित्य

### श्री ग. दि. माडगूळकर

महाराष्ट्र राज्य विधान परिषदेचे सदस्य म्हणून सुप्रसिद्ध मराठी कवि व साहित्यिक श्री. ग. दि. माडगूळकर ह्यांची नियुक्ति झाली ह्याबद्दल आम्हीं त्यांचे हार्दिक अभिनंदन करतों. 'दीपावली'वर माडगूळकरांचा पहिल्यापासून लोभ आहे व आमच्या विनंतीस मान देऊन त्यांनीं आजपर्यंत आम्हांला अनेक वेळां लेखन–सहाय्य दिलें. एवढेंच नव्हे तर वेळोवेळीं मार्गदर्शनहि केलें आहे. माडगूळकरांची साहित्यसेवा वाचकांस परिचित आहेच. त्यांचीं बोलपटांत गाजलेली दारोदारीं घोळवलीं जाणारी गाणीं लोकप्रिय ठरण्यास त्यांची प्रतिभावंत काव्यशक्ती, प्रासादिक रचना आणि संगीताचा परिचय हीं कारणीभूत झालेलीं आहेत. ह्या गुणत्रयींचा मधुर मिलाफ त्यांच्या 'गीतरामायणां'त किती प्रकर्षानें आढळतो हें सुधीर फडक्यांच्या कार्यक्रमांना सतत होणाऱ्या गर्दीमुळें ज्ञात होईल. तमाशा, बोलपट, वक्तृत्व आणि लेखन ह्या 'वाङ्मया'च्या सर्व दालनांत सारख्या.च प्रभावानें चमकणारे माडगूळकर हे एक साधेसीधे व प्रसिद्धीपराङ्मुख गृहस्थ आहेत हें सत्य आहे. त्यांचा वेष बावळा नसला तरि साधा त्यांच्या वर्तणुकीइतकाच सोज्वळ असतो. त्यांच्या अंगीं ज्या 'नाना कळा' आहेत त्यांचा परिचय हळुहळू महाराष्ट्रीय जनतेस होत आहे. कथाकथनांत रंगणारे आणि रंगवणारे माडगूळकर, नकलाकार माडगूळकर, मुद्देसूद (आणि कित्येकदां फटकळ ठरणारे) ओज़स्वी वक्ते, त्यांचे जुने व अभिजात स्वभावगुण आतां नव्यानें जनतेस परिचित होऊं लागले आहेत. मराठी बोलपटांच्या इतिहासांत त्यांनीं केलेले विक्रम उल्लेखनीय जसे ठरले तसे हिंदी बोलपटांच्या प्रगतीस त्यांनीं हातभार लावलेला आहे, आणि ह्या त्यांच्या कर्तृत्वाचा राजदरबारींही गौरव झालेला आहे. श्री. माडगूळकर त्यांच्या ह्या नवीन नियुक्तिनें आणखी एका क्षेत्रांत ते प्रवेश करीत आहेत. समाजसेवेचे कंकण बांधून महाराष्ट्रासाठीं आपली यथामति कर्तृत्वशक्ति खर्च करण्यास सज्ज झालेले माडगूळकर ह्यां नवीन आकर्षणामुळें मराठी साहित्याला व बोलपटांना विसरतील असें शक्य वाटत नाहीं. त्यांच्यातला कलावंत हा विधान-परिषदेंतही जागृत राहिल असें त्यांनीं त्यांच्या सत्कारसमारंभाच्या वेळीं दिलेलें आश्वासन ते पाळतील ह्यांत संदेह नाहीं.

### श्री. पु. ल. देशपांडे

सुप्रसिद्ध मराठी साहित्यिक आणि ख्यातनाम विनोदी लेखक श्री. पु. ल. देशपांडे आपली चार महिन्यांची पूर्व आशियांतली सुखसफर संपवून मे महिन्यच्या दहा तारखेस मुंबईस परतले. त्यांचे हें आगमन त्यांच्या 'बटाट्याच्या चाळी'च्या मुक्र झालेल्या प्रयोगांच्या जाहिरातीवरून अपेक्षित होतें. मागें इंग्लंडच्या दौऱ्यानंतर त्यांनीं लिहिलेली 'अपूर्वाई' गाजली तशी प्रस्तुत दौऱ्यानंतरची त्यांची नी 'पूर्वाई' गाजेल ह्यांत नवल नाहीं. सिद्धहस्त लेखक, मार्मिक स्वभावसमीक्षक व खिलाडू संभाषणचतुर पु. ल. ह्यांना आपल्या प्रवासांत जे विविध अनुभव आले असतील त्यांचे स्फोटक निवेदन ते करणार असल्याचें कळतें. बोटीवरच्या दीर्घ प्रवासांत त्यांनीं चाळीला नवीन रंगरंगोटी करण्यासाठीं 'असामी' निवडून तालमी केल्या होत्या व त्यांचे प्रयोग लवकरच सुरू होणार असल्याचें जाहिर झालें आहे. त्यांचा 'असामी'. 'दीपावली'त गाजला होता. पण वाचनापेक्षां त्यांच्या कथनांत नवीन आणि अधिक लज्जत येते हें 'चाळी'च्या तडाखेबंद हाऊसफुल्ल कार्यक्रमानीं सिद्ध झालें आहे. मराठी वाचकांना आणि श्रोत्यांना आपल्या अनुपस्थितीनें त्यांनीं केलेला उपन्यास पु. ल. सव्याज भरून काढतील अशी खात्री आहे.

× × ×

## सत्यं शिवं सुंदरम्

### श्री. ना. रा. अभ्यंकर

मराठी रंगभूमीवरचे एक हरहुन्नरी नट श्री. ना. रा. उर्फ नाना (साहेब) अभ्यंकर ह्यांना महाराष्ट्र सरकारनें अडीच हजार रुपयांचे वर्षासन देऊन त्यांच्या अष्टपैलू व्यक्तिमत्वाचा गौरव केला आहे. बालपणापासून रंगभूमीची चटक लागलेल्या नानानें बालवयांतच आपल्या अभिजात नाट्यगुणाची चमक दाखवून आपल्या शिक्षकांना चकित करून सोडलें होतें. गणेशोत्सवांत बसविण्यासाठीं एका उपलब्ध संमिश्र फार्साचें पुरवी रूपांतर स्वतः करून, तो बाळगोपाळांच्या नटसंचात बसवून त्यांत प्रमुख भूमिका करणाऱ्या तेरा वर्षांच्या नानाचें कोड कौतुक केलें गेलें ह्यांत नवल नव्हतें. पुढें नॅशनल मेडिकल कॉलेजमध्यें असतांना 'वेड्यांच्या बाजारां'त त्यांनीं केलेली बाळाभाऊंची भूमिका गाजली. पुढें काहीं काळ वामनरावांच्या सान्निध्यांत असतांना त्यांच्याच आग्रहावरून नाट्यकला प्रसारक मंडळांत थोर वामनरावांच्या नव्या नाटकांत काहींही मोबदला न घेतां खलनायकाचें काम ते करत असत. मुंबईत अनंतराव गद्र्यांनी स्थापन केलेल्या मुंबई नाटिका

संगीत मंडळीचे कांहीं काळ ते आधारस्तंभ होते. नाना चाफेकर आणि नाना अभ्यंकर ह्या सुशिक्षित नटद्वयांनी त्याकाळीं रंगभूमी गाजवली होती. ही कंपनी बंद केल्यानंतर नाट्यसेवानिवृत्त होण्याच्या विचारानें आधींच बाहेर पडलेल्या नाना अभ्यंकरांनीं नूतन नाटिका संगीत मंडळी काढली. पण ह्या प्रयत्नास यश न येतां हरिश्चंद्राप्रमाणें नानांना गहाणदारी पत्करावी लागली आणि ह्या नाट्यनिष्ठावंतानें ती पत्करली. पुढें ही कंपनी बंद केल्यावर शिरोधार्थ कर्जातून उतराई होण्यासाठीं नानांनीं कष्ट उपसले, रक्ताचें पाणी केलें पण चारित्र्य गमावलें नाहीं हें विशेष उल्लेखनीय आहे. ह्या नंतर नानांनीं साहित्य संघाच्या नाट्य-महोत्सवांत अनेक वैशिष्ट्यपूर्ण भूमिका करून आपला पीळ कायम असल्याचें सिद्ध केलें आहे. नानांच्या जीवनांत त्यांची जिद्द हा त्यांच्या स्वभावाचा स्थायीभाव ठरला आहे. हुतूतू, आट्यापाट्यासारखे मैदानी खेळ, ब्रिज बुद्धिबळासारखे बैठे खेळ ह्यांत त्यांनीं जें प्राविण्य मिळवलें तेंच त्यांनीं आपल्या सिद्धहस्त लेखनांतही दर्शविलें. 'खरा वारकरी'-सारखी कादंबरी पंधरवड्यांत लिहून त्यांनीं वीर वामनरावांकडून शाबासकी मिळविली. पुढें आणखी दोन कादंबऱ्या लिहिल्यानंतर वीर वामनरावांच्या मार्गदर्शनाखालीं त्यांनीं लिहिलेलें महात्मा गांधींचें चरित्र हें मराठी वाङ्मयांतल्या प्रासादिक चरित्रवाङ्मयांत उल्लेखनीय ठरलें आहे. असहकारितेच्या चळवळींत त्यांनीं शिक्षण जरी सोडलें तरी अभ्यास व परिश्रम करण्याची वृत्ति त्यांच्यांत किती जाज्वल्य आहे ह्याची साक्ष प्रस्तुत भव्य चरित्रग्रंथ देईल. अशा अष्टपैलु व्यक्तिमत्वाचा हा सद्गृहस्थ आपल्या अव्यावहारिक प्रसिद्धीविन्मुखतेमुळे आजपर्यंत उपेक्षित राहिला होता. नाकासमोर सरळ जाणारे भिडस्त नाना आपल्या मित्रपरिवारांत किती रंगतात व रंगवतात हें अनुभवानेंच आकलन होऊं शकेल. आता साठीच्या जवळ आलेले नाना पूर्ववयांत कमावलेल्या सुदृढ व निरोगी देहयष्टीनें ताठ उभे आहेत. निरोगी शरीर व मनःप्रकृति, कष्ट उपसण्याची जिद्द, स्वाभिमान आणि माणुसकी ह्यांच्या भांडवलावर निरपेक्ष जीवन व्यतीत करणाऱ्या नानांचा ह्या सरकारी बर्षासनामुळें एक तऱ्हेचा गौरव झाला हें उचितच झालें. श्री. नानासाहेब अभ्यंकरांचे आम्हीं अभिनंदन करतों व त्यांना दीर्घायुरारोग्य प्राप्त होवो असें चिंतितों.

• • •

## चांडक पति-पत्नीचा युरोपचा दौरा



सिन्नर येथील सुविख्यात विडी कारखानदार मे. बस्तीराम नारायणदास महेश्री व मे. चांडक ब्रदर्स या कंपन्यांचे एक सुविद्य भागीदार व 'दीपावली'चे हितचिंतक श्री. रामनाथशेट चांडक व त्यांच्या पत्नी असे उभयतां रविवार ता. ६ मे १९६२ रोजीं रात्रौ ९ वा. ५५ मि. 'स्विसएअर' कंपनीच्या विमानानें निघून रोमला रवाना झाले. तिथून जर्मनी, स्वित्सर्लंड, इंग्लंड वगैरे युरोपांतील मोठ्या राष्ट्रांचा दौरा आटोपून जमल्यास अमेरिकेला जाण्याचा त्यांचा मानस आहे. श्री. रामनाथशेट या त्यांच्या दौऱ्यांत तंबाखूवरील प्रक्रीया व संस्करण ( Frocessing & curing ) या विषयांवर माहिती मिळवून, तेथील ठिकठिकाणच्या सिगरेट कारखान्यांची पहाणी करतील.

मे. बस्तीराम नारायणदास महेश्री या विडी कारखान्यानें चाळीस वर्षांची तपश्चर्या पार पाडली असून, आज या कारखान्यांत त्यांच्या ठिकठिकाणच्या शाखा मिळून १२००० कामगार आपली उपजीविका करीत आहेत. सुरवातीस शेट बस्तीराम व शेट नरसिंगदास चांडक यानीं या कारखान्याची धुरा यशस्वीरित्या वाहिली असून, आज त्यांच्याच सल्ल्यानें श्री. रामनाथशेट चांडक व श्री. देवकिसनदास सारडा कारखान्याचे सर्व व्यवहार हाताळीत आहेत. आज या कारखान्याचा विस्तार देशाच्या विविध भागांतून पसरला आहे. श्री. रामनाथशेट यांच्या आगमनानंतर, कारखान्याचे दुसरे भागीदार, शेट बस्तीराम यांचे चिरंजीव श्री. देवकिसनदास सारडा यांचा जपानला जाण्याचा विचार आहे.

श्री. रामनाथशेट चांडक व त्यांच्या पत्नी यांना त्यांच्या या दौऱ्यांत आम्ही दीपावलीतर्फे सुयश चिंतितों.

—संपादक, 'दीपावली'

---

[ पान ५७ वरून ]

आहांत. आणि तें योग्यच आहे. जर धर्म हा खरोखरीच थोर पुरुष नसेल तर त्याला थोर मानणें चूक. आम्ही हजारों वर्षे ती चूक करीत आलों म्हणून यापुढेंहि ती करावी हें योग्य नव्हे. विचारांना धक्के देणारं साहित्य प्रसिद्ध करून आपण एक समाजसेवा करीत आहांत म्हणून आपण व आत्माराम नीळकंठ दोघेहि स्तुतीस पात्र आहांत. कळावे,

आपला हितेच्छू,
चिं. ग. फणसे

\+ \+ \+

स. न.

आपला मेचा अंक संपूर्ण वाचला. गोष्टी ठीक आहेत. लेखहि बरे आहेत. पण मला सर्वांत जास्त आवडली तीं आपलीं कार्टून्स. एखादी गोष्ट वाचून मनावर जो परिणाम होत नाही तो तीं कार्टून्स पाहून होतो.

आपण आपल्या कार्टूनचं एखादं पुस्तक प्रसिद्ध करून तें दीपावलीच्या वर्गणीदारांस सप्रेम भेट कां देत नाहीं ? (मी वर्गणीदार आहे हें आपल्या लक्षांत आले असेलच !) आपण या सूचनेवर विचार करावा.

कळावे.
आपला,
चंद्रकांत सामंत

\+ \+ \+

स. न.

तुमचा दीपावली अंक असतो चांगला. पण त्यांत आम्हां मुलांमुलींनीं लिहिलेला किंवा मुलांमुलींसाठीं लिहिलेलं कांहींच नसतं. असतं ते सारं मोठ्यांसाठीं. आम्हीं मुलांनी तुमचं मासिक वाचूं नये का ? मग योग्य ती सुधारणा लौकर कराल ना ?

आपले बाल वाचक,
अरुण, शैला,
मोहन, विजया




संपादक, 'दीपावली' यांस,

स. न. वि. वि.

दीपावलीचा माहे मेचा अंक वाचला. महाराष्ट्र राज्य वर्धापन दिन विशेषांक म्हणून आपण जो अंक काढला तो समयोचित वाटला. महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री श्री· यशवंतराव चव्हाण यांचे अधिकारपूर्ण विचार वाचून 'पंचायत राज्य' विषयींची कल्पना आली.

यशवंतराव किंवा अशाच अधिकारी व्यक्तींचे विचार आपण दीपावलींतून अधून-मधून द्यावेत.

आपल्या कथांपैकीं श्री. दत्ता कदम यांची 'श्रीमंत योगी' कथा निराळ्या तऱ्हेची वाटली. शिवाजी महाराज हेहि कथेचे नायक होऊं शकतात हें पटलें. मात्र इलस्ट्रेशनमधली जिजाबाई किंचित् तरुण वाटते. मला स्वतःला चित्रांतलं फारसं कांहीं कळत नाहीं, तरीपण जें वाटलं तें निःसंकोचपणे लिहिलं. त्याबद्दल आपण रागावणार नाहीं अशी आशा आहे.

कळावे,

आपली,

**शशिकला करकरे**

× × ×

स. न.

दीपावलीच्या मे ६२ च्या अंकाचें कव्हर अप्रतिम सुंदर आहे. (माझ्या एका मैत्रिणीच्या चेहऱ्याचें साम्य त्यांत आहे म्हणून नव्हे तर खरोखरीच तें सुंदर आहे.) आपण Original Picture चें काय करतां ? विकत मिळूं शकेल का ? मला तें हवें होतें.

अंकांतील इतर साहित्यहि दर्जेदार आहे. दीपावलीने आपली परंपरा राखलेली आहे याबद्दल आपले व आपल्या सहकाऱ्यांचें अभिनंदन.

कळावे,

आपला,

**दत्तात्रेय सोमण**

(वसई)

× × ×

स. न.

दीपावलीच्या हल्लीच्या कांहीं अंकांत आपण श्री. आत्माराम नीलकंठ यांची 'हा जय नांवाचा इतिहास आहे' ही लेखमाला प्रसिद्ध करीत आहांत. या लेखमालेच्या योगानें आपण आमच्या जुन्या पारंपारिक श्रद्धेस हादरा देत

[ पान ५६ वर ]












# 'वेस्ट इंडीज'मधील 'बाटल्या'



कि ती साधे प्रसंग! नवऱ्यानें बाजारांतून नेमक्या उलट्या वस्तु आणाव्यात आणि मग बायकोनें त्याच्यावर रागानें लालबुंद व्हावं, वा शेजारच्या बंडोपंतांनीं सुट्टीच्या दिवशीं दुपारीं भल्या मोठ्या आवाजांत रेडिओ कोकलत ठेवला कीं झोपमोड झालेले आपण त्यांना एक शेलकी शिवी मोजून कुशी बदलतो, किंवा गांवाला जातांना खिसेकापूनें नेमके पाकिट पळवावें कीं मग आपल्या मनांत त्या अज्ञात शर्विलकाबद्दल जी एक चिडीची भावना निर्माण होते त्याला तोड नाहीं. ह्या सर्व प्रसंगीं आपल्या मनांत क्रूद्धतेच्या ज्या निरनिराळ्या भावना असतात त्या सर्व, अंपायरनें चुकीचा निर्णय दिला असं वाटलं कीं वेस्ट इंडिजमधील क्रिकेट प्रेक्षकांच्या मनांत उचंबळून येतात! मग बाटल्यांचा वर्षाव सुरू होतो, स्टेडिअम डोक्यावर घेतला जातो, शिमग्यातलं कवित्व सुरू होतं, प्रेक्षकांत लठ्ठालठ्ठी सुरू होते, कांहीं धीट क्रिडांगणावर उतरून अंपायरचा गळा धरायला येतात. त्यांना अंपायरचा निर्णय मंजूर नसतो. वेस्ट–इंडिजमध्यें क्रिकेटचा हंगाम सुरू झाला कीं एकदां तरी हा असा 'शिमगा' प्रेक्षकांकडून साजरा केला जातो.

भारताविरुद्ध चालू असलेल्या कसोटी सामन्यांपैकीं दुसऱ्या कसोटी सामन्यांत त्यांनीं ही 'शिमगा' वृत्ती दाखविली. प्रसन्नानें फेंकलेला चेंडू यष्टीरक्षक इंजिनियरनें अचूक पकडला व धांव घेत असलेल्या जो सॉलोमनला धांवचीत केलें. अंपायरनें सॉलोमनला 'बाद' म्हणून जाहीर केल्यावर बाटल्यांचा वर्षाव क्रिडांगणावर सुरू झाला. कां? तर इंजिनियरनें चेंडू हातांत येण्यापूर्वींच यष्टी उडविली म्हणे. मध्यंतरी भारतांत येऊन गेलेल्या लेरी कॉन्स्टन्टाईनचे शब्द खरे ठरले तर! तो म्हणाला होता कीं, "माझ्या वेस्ट इंडिजमधील प्रेक्षकांकडून तुम्ही सहानुभूतीची अपेक्षा बाळगूं नका." चूक झाली कीं ते हा असा बाटल्यांचा पाऊस पडतात.

पण हा परवांचा प्रसंग फार मामुली ठरावा; कारण मागें लेन हटनच्या नेतृत्वाखालीं जेव्हां इंग्लंडचा संघ वेस्ट इंडिजमध्यें गेला होता तेव्हां एका प्रसंगीं ह्या प्रेक्षकांनीं सोडावॉटरच्या बाटल्यांचा इतका मुसळधार पाऊस पाडला कीं क्रिडांगणावर इतस्ततः पसरलेल्या त्या बाटल्या जेव्हां मागाहून गोळा केल्या तेव्हां त्या नेण्यासाठीं मह ट्रकहि अपुरे पडले!! त्यांतलाहि प्रसंग किती साधा होता. डेनिस कॉम्प्टन ह्या प्रसंगाचं वर्णन करतांना आपल्या End of an innings ह्या पुस्तकांत लिहितो—

तेथील प्रेक्षक हे पक्के जुगारी आहेत. सामना पाहण्यासाठीं ते येतात ते खिशांत नोटांचीं बंडलं ठेवून. सामना संपल्यावर, कांहींचे खिसे तुडुंब भरलेले असतात तर कांहीं रिकाम्या खिशानें घर गांठतात. त्यांच्या पैजेच्या अटी मनोरंजक असतात. एखाद्या फलंदाजानें चाळीस धांवा काढल्यावर 'हा पन्नास धांवा काढूं शकेल कीं नाहीं?' ह्याबाबत त्यांचा जुगार सुरू होतो. आंकडे फेकले जातात, आंकडे झेलले जातात! किंवा एखाद्या गोलंदाजानें चार बळी घेतल्यावर तो पांचवा बळी घेईल कीं नाहीं? ह्या पैजेवरही ते आंकडे लावतात. कोणीतरी आंकडा बोलतो, कोणीतरी ओरडतो–'ए लिधी!' ['लिधी' ह्या गुजराती शब्दाचा अर्थ–Accepted] एका कसोटी सामन्यांतली गोष्ट. वेस्ट–इंडिजचा संघ फलंदाजी करीत होता. त्यांची वॉल्ट व मॅकवॅट ही जोडी चांगली टिकली होती. हां हां म्हणतां त्या दोघांची नव्वद धांवांची भागीदारी झाली. त्याबरोबर प्रेक्षकांत चलबिचल सुरू झाली. निरनिराळे आवाज सुरू झाले. एकच कोलाहल! ही जुगाराची नांदी होती! ह्या दोघांची शंभर धांवाची भागीदारी होते कीं नाहीं? ह्यावर सट्टेबाजांनीं आंकड्यांची देवाण–घेवाण सुरू केली होती. एकेक धांव वाढत होती, त्याबरोबर उत्कंठा शीगेस पोहोंचत होती. ९५,९६,९७... प्रेक्षक आतां उठून उभे राहिले होते. डोळ्यांत तेल घालून धांवांचा जप करीत होते. ९८ झाल्या! वाहवा!! ९९ झाल्या. पुष्कळ ओरडले–'जवळ जवळ जिंकलोंच काढा पैसे!!' तर दुसरे तितक्याच त्वेषानें म्हणाले, 'अजून एक धांव बाकी आहे. सबूर करा!' आणि काय आश्चर्य! शंभरावी धांव पुरती न काढतांच मॅक्वॅट धांवचीत झाला!! जुगार हरलेल्यांना वाटलं जणूं काय आकाश कोसळलं! ते चिडले, संतप्त झाले. त्यांनीं स्टॅडियम डोक्यावर घेतलं. सोडा वॉटरच्या बाटल्यांचा वर्षाव क्रिडांगणावर होऊं लागला. तो पाहून पोलिसहि हवालदिल झाले. मध्यें जाण्याची त्यांची हिंमत होत नव्हती. कारण बाटल्या अचूक त्यांच्या डोक्यावर येत व त्यांना रक्तानें माखून टाकीत. खेळ अर्थातच थांबविण्यांत आला होता. सर्व खेळाडूंना मोठ्या शिताफीनें 'पॅव्हिलियन' मध्यें सुखरूप पोंचविण्यांत आलं होतं. व ज्या अंपायरनें हा 'धांवचीत' निर्णय दिला होता त्याला अगदीं पोलीस बंदोबस्तांत ठेवला होता. कारण सारा प्रेक्षकगण त्याच्यावर खवळून उठला होता. वर्षाव चालूच होता. मिलिटरी बोलवावी कीं काय? असं वाटूं लागलं होतं. ज्या वेगानें बाटल्या येत होत्या, त्याच वेगानें स्टेडियमची नासधूस होत होती! मॅनेजर बावरून गेला. प्रेक्षक शांत होण्याची चिन्हें दिसेनात तेव्हां हटनला तो म्हणाला, 'आजचा खेळ थांबला असं जाहीर करूं या? आपण उद्यां खेळ सुरू करूं या.' हें ऐकून हटननें ताडकन् उत्तर दिलें—'हे जमायचं नाहीं. खेळ आतांच सुरू झाला पाहिजे. वेस्टइंडिजचे कांहीं फलंदाज मला आज बाद केलेच पाहिजेत!' हे ऐकून 'आपल्याला धरणीमातेनें पोटांत घ्यावें' असं त्या मॅनेजरला झालं. त्यानें धांवाधांव करून तो वर्षाव थांबविला. प्रेक्षकांना शांत केलं. क्रिडांगण साफ करण्यांत खूप वेळ निघून गेला. थोडा वेळ उरला होता. व तशा स्थितींत मग खेळ सुरू झाला. मागाहून कळलं कीं तो प्रेक्षकगण आधीच धुमसतच होता कारण त्याच दिवशीं संध्याकाळीं त्यांनीं त्या अंपायरच्या बायका–मुलांना फार त्रास दिला! •••

हें मासिक, संपादक व मुद्रक श्री. दीनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०१४२ कॅनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रकाशित केलें.



अनुक्रमणिका

# केशभूषेचें सौंदर्य

**स्वस्तिकचे परफ्युम्ड कॅस्टर ऑइल** वापरल्याने उत्तम केशभूषेच्या सौंदर्याचा ठेवा तुमच्या मालकीचा होईल. कारण ह्या तेलाने तुमचे केस मोहक व मुलायम होतात.







**केशरचनेकरितां सूचना:**

केसांना स्वस्तिक परफ्युम्ड कॅस्टर ऑइल लावून ते हलकेंच विंचरा. सर्व केस एकत्र करून मागील बाजूस एका रिबिनीनें बांधा. नंतर सर्व केसांचा एकत्र विळखा घालून ते वरच्या बाजूस आकड्यांने टांचा आणि उरलेले केस डाव्यां बाजूस तसेंच ठेवा (आकृति पहिली) उरलेल्या केसांची वेणी घालून तिचीं टोके आधीच्या विळख्यात अडकवां (आकृति दुसरी) नंतर ही केशरचना आकडे लावून पक्की करून त्यावर दागिने माळा.

स्वस्तिक केशरचना शैली "अलंकार"



